# गांवाकडच्या गोष्टी


लेखक :

**व्यंकटेश माडगूळकर**

चित्रकार :

**दीनानाथ दलाल**



१९५१

किंमत तीन रुपये बारा आणे

# गांवाकडच्या गोष्टी



पहिल्या दहा कथा सामाहिक मौजमधून क्रमशः प्रसिद्ध झाल्या. 'न्याय' व 'आडिट' अभिरुचि, 'बेत' सत्यकथा, 'वहाणा' लोकसत्ता, 'फक्कड गोष्ट' झंकार व 'काय सुदीक गेलं न्हाई' मौज या नियतकालिकांच्या दिवाळी अंकातून.

## बोजा

… रस्त्यानं चालूं लागला म्हणजे डाव्या पायावर अधिक भार टाकतो. त्यामुळं … अंगाची काठी सारखी झोले घेत असते. मोहरमचे 'नालसाहेब' असेच … घेतात. या सारखेपणामुळं गांवांतले लोक नेवराला 'नाल्या नेवरा' म्हणून … खवतात. अंगांत एक मळका गंजिफरास, खालीं आंखुड धोतर आणि … र पांढरी टोपी घालून नेवरा गावांतून हिंडताना नजरेस पडतो. फारसा … पिकाची उसाभर करीत तो रानातच असतो. पण त्याचं घर गांवांत …हे. जातीचा कुणबी असूनहि नेवराच्या आईला लोक बजा वाणीण म्हणतात. म्हातारी माल्यासारखी उंच आहे, पण म्हातारपणामुळं विळ्यासारखी वाकली …. आपल्या घरांत एवढीशी खोली काढून तिनं त्यांत किराणा मालाचं दुकान … आहे. धडा दोन धडे गूळ, मणपायली तेल, शेरमापटं शेंगदाणे असा …ताचा माल तिच्या दुकानात असतो. कपाळाला बुक्का लावून आणि गळ्यात … घालून ही म्हातारी गुळगुळीत पाटावर बसते आणि रुपयामागं आठ आणे …दा हिकमतीनं उठवते. पैसा दोन पैसे उधारी राहिली तरी दुसऱ्याच्या दारात … धरून बसते आणि वसुली होईतों तोंड वाजवते. आपल्या मिळकतींतला …बडा छदामहि ती पोराला देत नाहीं. ओढायला तंबाखू पाहिजे असली … नेवराला म्हातारीपाशीं पैसे मोजावे लागतात. म्हातारी दुकानाचा माल …ण्यासाठीं मात्र पोराकडून पैसे घेते. महिन्याला मोटारींतून पंढरीची वारी …, उंची धडुतीं फाडते आणि जिवाला गोडधड करून खाते.

…वराची बायकोहि मोठी हारदमख्याली आहे. बजाची ही सून दांतवण … दांत काळेभोर करते. अफूची गोळी घालून पोराला पाळण्यात टाकते … गटाळण्या घालीत गांवभर फिरते. लोक म्हणतात, नेवरानं एकवार …ला चांगलं लथलावं. पण नेवराच्या हातून ही गोष्ट होण्यासारखी नव्हती.

एकतर तो स्वतः स्वभावानं मवाळ होता. वाळल्या पाचोळ्यावर पाय न देणारा होता. आणि दुसरं असं कीं बायकोवर हात टाकला तर ती तो निमूटपणें सोसेल असा भरंवसा नव्हता. उलट तिनच चार तडाखे दिले तर केवढी नामुष्कीली! याचा दाखला त्याला स्वतःला नाहीं तरी म्हातारीला अनेकवार आला होता. सुनेवर तोंड टाकायला गेल्यावर तिनं सासूचे दोन्ही हात धरून तिच्या खोल गालफडावर चार ठेवून दिल्या होत्या. बजावलं होतं कीं,

" याद धर थेरडे, पुन्हा माज नाव काढशील तर पाय मोडून टाकीन ! "

बजा अशी गप बसणारी बाई नव्हती. तिनें तोंडावर हात घेऊन सारं गाव जमा केलं. तक्रार घातली. पण लोकांना दोघी जणीहि कोणत्या गुणाच्या तें ठाऊक होतं. ' कुत्ता जाने और चमडा जाने ' म्हणून सगळ्यानीं काहीं मनावरच घेतलं नाहीं. मग चिडलेल्या म्हातारीनं सुनेला इख घातल. देव घातले. ' करणी ' केली. पण सून सगळ्यातून सुटली. ती म्हातारीचा बाप होऊन राहिली होती ! आणि या सगळ्या महारगोधळात बिचारा नेवरा मुठीत जीव धरून दिवस ढकलीत होता. दिवसेंदिवस खंगत चालला होता. नेवरा बाइलीच्या आरीं पडलाय म्हणून लोक हिणवीत, म्हणून फारसा गावातहि येत नव्हता. कर्जाचा बोजा फार झाल्यामुळं तो अगदीं मेटाकुटीला आला होता, डबघाईला आला होता. शेतीभाती, गुरढोरं असतांना नेवराला बोजा झाला कसा ? आई आणि बायको याच्या काईलीमुळं. म्हातारी माल आणून उधारी नेवराच्या नावावर माडायला शहरांतल्या वाण्याला सागायची. पंढरीला निघाली म्हणजे वाटखर्चीसाठी पाचपंचवीस रुपये दुसऱ्याचे काढून तिला द्यावे लागायचे. बायको गावच्या सोनाराकडून कडीतोडे ठोकून घ्यायची. त्या दोघी सासवासुना बामणाच्या माणसावाणी झ्याकींत रहायच्या. तीस तीस रुपयाचीं लुगडीं फाडायच्या. दिवसातन दहा वेळा कडक चहा प्यायच्या. या खर्चाच्या वागण्याला नेवरा कसा पुरा पडणार ? बोजा फार झाला. नेवराला अन्न गोड लागेना !

एकदा त्याची गणा चलपत्याशीं मुलाखत झाली. नव्या बाधलेल्या घराच्या पायरीवर शिग्रेट ओढत गणा बसला होता. माणूस मोठा हुशार होता. जिंदगीतले बरेच दिवस मुशाफिरी करीत तो शहरगांव हिंडला होता. त्याच्यापाशीं बक्कळ पैसा आहे अशी बोलवा गांवात होती. त्याचे केस इंग्रजी पद्धतीनं



कापलेले असत. एक दिवस आड तो गुळगुळीत दाढी करी. आणि साबण लावून धुतलेला कफकॉलरचा शर्ट घाली. रेडिओ, ग्रामोफोन, पारशी आणि युरोपियन् लोकाच्या चालीरीती, रेल्वे आणि मुंबई याविषयींची त्याची माहिती आश्चर्यकारक होती. वाऱ्यानं न विझणारा दिवा, कळीची चकमक आणि सायकल असल्या अपूर्वाईच्या वस्तू त्याच्या मालकीच्या होत्या. खरोखर गणा मोठा माणूस होता. त्याची बायकोसुद्धां कागद वाचूं शकत होती. अंगाच्या काठीला

झोले देत नेवरा चालला असतांना गणानं त्याला बघितला आणि त्याला हांक देऊन बोलावलं. म्हटलं,

" ये की. शिग्रेट ओढ. "

गणासारख्या किंमतवान माणसानं बोलावून पांढरी विडी ओढायला देणं ही गोष्ट खचित अभिमानाची होती. नेवरा बसला आणि आरामात धूर गिळूं लागला. मग गणानं गोष्ट काढली,

" नावोनाव वाळूं लागलास नेवरा. शीक हायेस काय ? "

" चालायचच ! परपंच्याच्या काळजीनं माणूस खाली येतो ! "

" तुला परपंच्याची काळजी का ? बक्कळ कुणबावा हाय, म्हातारी शापवर पैसा कमवतीय–"

" दिसायला दिसतंय हे गणा, पर मी चौ अंगानं खालीं आलोय् ! "

यावर गणा शहरगावातल्या माणसासारखा हसला. बोलला, " मला नको बनवूंस ! "

" अन्नाच्यान् खोटं न्हाई गणा ! हातांत अग्नी हाय. लई वडावड चाललीया माजी ! "

" कंच्या गोष्टीची ? "

" पैक्याची–आन् दुसरी कंची ! "

" लबाड बोलतोस ! "

" आत्ता ! तुज्या गळ्याच्यान् रं. सुटली बोल–"

" सुटली. पर अस का ? तुज्यासारख्याला ही काळजी का ? "

" खरं तर असू ने. पर घरची मानसं चागली न्हाईत गणा. म्हातारी अन् बायकू माज रगत खात्यात ! "

" ते कस ? "

" म्हातारी मालासाटीं पैका घेती. बायकूची रहाणी चामणीणीवाणी खर्चाची. लौकाचं देणं लई झालयू बग मला ! "

" आ ? "

" व्हय. त्येनंच खाल्ल्यालं आन्न माज्या अंगीं लागना ! "

बोलतां बोलतां स्वतःची स्वतःला कणव येऊन नेवराचा आवाज कापरा झाला.

" कुणाला सांगावं तरी रं ? कुणापाशी बोलत न्हाई बग. मनालाच खातू अन् गप बसतू. आज तूं काळजाला हात घातलास म्हणून बोल्लो. गणा, गड्या ह्या गुंत्यातनं कसं सुटावं हें साग. तू शाणा माणूस शारगांवांत वागल्याला. आमा अडाण्याला वाट दाव ! "

" अरं दावणीचं एखादं जनावर मोड. भागव बोजा ! "

" जनावर मोडून कस भागंल ? मिळतय् ते आन्नबी तुटंल ! "

मग दोघेहि घटकाभर गप बसले. काळोख झाला होता. समोरच्या घरांतून दिवे लागले होते. गणाच्या घरापुढच्या लिंबावर बसलेले पांढरे बगळे आतां दिसेनासे झाले होते. गार वारा सुटला होता. मग गणानं दुसरी शिग्रेट काढली. एक नेवराला देऊं केली. तसा तो म्हणाला,

" नग मला ! "

" कां रं ? "

" नग. आपल्याला सवय न्हाई हे वडायची. सपक लागती. बरसान ईल. तंबाकू ह्यापरीस बेस. तूं वड ! "

गणानं धूर काढला.

" नेवरा, गड्या मी बोलतो, पर तुला अवघड वाटणार न्हाई न्हवं ? "

" न्हाई. तूं बोल. अरं तू काय वाईट सागशील का ? तू माजा का वाद्या हायेस का ? "

" असं कर. जिमिनीचा एखादा तुकडा बेच. त्याशिवाय दुसरी वाट न्हाई ! "

नेवरा नाहीं म्हणाला खरा, पण गणाच्या या सल्ल्यानं त्याला अवघडच वाटलं. चैनीखातर झालेला बोजा फेडण्यापायीं बापजाद्यानीं कमावलेली जमीन विकणं म्हणजे केवढी हरामी ! जनलोक काय म्हणंल ? नेवराला आपल्या म्हातारीचा आणि बायकोचा राग राग आला. त्या दोघींनींच त्याच्या गळ्याला फांस लावला होता.

" गणा, असं कसं रं करावं ? जनलोक काय बोलल ? "

" अरं, जनलोक तुझा बोजा फेडायला येतात का ? तुझ्या घरांत चूल पेटंना तर कोण जेऊं घालणार हाय का ? "

यावर नेवरा काहीं बोलला नाही. उगीच बसून राहिला. ही गोष्ट गणानं नवीनच सांगितली अशातला भाग नव्हता. एकातीं बसला असता हा विचार नेवराच्याहि मनीं आला होता. पण जमीन विकायला त्याचं काळीज घट्ट होत नव्हत. असा विचार मनात येणं ही गोष्टसुद्धा शरमेची अशीच त्याची भावना होती. पण आतां गणासारख्या शहाण्या माणसानंदेखील हाच उपाय सुचवला तेव्हा त्याचं मन डळमळूं लागल. वाटूं लागल कीं, जमीन विकावी. पण तस तो गणापाशी बोलला नाही. म्हणाला,

"वखुत झाला गणा. जातो. जनावरास्नी वैरण टाकायची हाय!"

आणि उठून रानाकडे गेला!

मग चार रोज हीच गोष्ट त्याच्या मनीं घोळत राहिली. आणि अखेर त्यानं ठरवलं कीं जमीन विकायची. दोन एकर विकायचे. हा कारभार एकट्यानच करावा कीं चार माणसाचा सल्ला घ्यावा? म्हातारीचा विचार घ्यावा? पण कुणाचा विचार घेऊन काय करायचं? देण्याच्या काळजीनं मी मरायला लागलोय्. कुणी मला तारणार आहे का? फुकट हाय सगळा पसारा! आपला जीव सुखात असला तर ह्या जमिनीचा, गुराढोराचा उपयोग! काळजीन काळजीन खगून मेलों तर जमिन संगं येणार आहे का? आणि म्हातारी तरी? बायकोसुद्धा दारापर्यंतच पोचवायला येईल. मग कुणाचा विचार का म्हणून घ्यावा? चोख एक तुकडं बेचावं आणि बिनघोरी व्हावं.

मग नाऱ्या नेवरा आवर्जून गणाला भेटला. रात्रीं काळोखात लिंबाखाली बसल्या बसल्या त्या दोघाची भाषा झाली.

"गणा, तूं सागितलेली वाट मी धरली!"

"तुकडं इकतोस का?"

"व्हय इकतो!"

"म्हातारीचा इचार घेतलास का? गिऱ्हाईक बघितलंस का?"

"इचार कुनाचा आन् कशाचा घ्याचा? जिमिन माजी हाय. मी तिच्र वाटंल ते करीन. आता गिऱ्हाईक मातूर कुनी भेटल न्हाई. भेटलं न्हाई म्हजे काय, मी कुनाकडं गेलोच न्हाई!"

" मग ? "

" माझं म्हणणं अस हाय गणा, आता कुठ कुणाला गळ घालू ? जिमिन घिऊन टाक ! "

" छ्य छ्य, अर मला काय करायचं हाय तुझ्या जिमिनीनं ? येडा काय तूं नेवरा ! मर्दा, तुला असं वाटलं काय, मला जिमिन पायजे म्हणून तुला हुलीवर घातला ? "

" तसं न्हव हा, अन्नाच्यान् तस न्हवं. पर मीच म्हणतो तू घिऊन टाक ! "

अशी ' हो ना ' ' हो ना ' झाली. खरं तर गणाला मनातून जमीन घ्यायची होती. किंबहुना, त्याच हिशोबानं त्यानं नेवराला ही वाट धरायला सांगितल होतं. पण तसं दाखवावं कसं म्हणून त्यान आढेवेढे घेतले. नाना सबबी सांगितल्या.

" नेवरा, माज्यापशी पैका न्हाई. मी जिमिन घेऊ कशी ? "

" नग आता लई वढून धरुस, गणा. काय दोनपा रुपय कमी दे. पर तूच जिमिन घे ! "

अखेर गणानं जिमिन घ्यायचं कबूल केलं. आणि पुढच्या दोन दिवसांत ' इसार पावति ' झाली. अंगटा उटवून देऊन शभर रुपये कनवटीला लावून नेवरा घरीं आला. त्या दिवशीं नेवरा पोटभर जेवला.

दुसरा दिवस संपला.

रात्री भाकरी खायला नेवरा घरीं आला आणि तिथला प्रकार बघून त्याला दरदरून घाम सुटला. म्हातारीन आढ्याला दोर टागून फास तयार केला होता. बायको वरवटा पुढ्यात घेऊन बसली होती. जणू जय्यत तयारी करून नेवऱ्याच्या येण्याचीच वाट बघत होत्या. तो येताच दोघीनींहि गहिंवर घातला.

" अरं असा कसा र कसाई जन्माला आलास ? अर बापजाद्यानी मिळवलेली जिमिन कशी रं इकलीस ? "

" अवं आमी तुमचं कुनी न्हवतोच का ! आमाला न विचारता जिमिन कशापायीं इकली ? आता आमी पोटाला का बिब घालावं का ? "

बायको वरवट्यावर ताडताड डोकं आपटून घेऊं लागली आणि म्हातारीनं

पायाखालीं घडवंची घेऊन फांसांत मान अडकवली ! घाबराघुबरा होऊन नेवरा म्हातारीला आडवा गेला तेव्हां लाथ झाडून तिनं त्याला बाजूला केला. नेवरा तोडावर हात घेऊन ओरडला,

" असं कशापायी ग आये, फास घिऊन मला काळं पानी दावतीस का ? "

" अरं काळ्या पान्यानं न्हाई भागायच. तूं फासावर चढशील. तुझी करणी बघण्यापरीस मी फासावर मरतें. मला आडवा नग होऊस ! "

इकडे बायकोनं कपाळ रक्तबंबाळ करून घेतलं. तिच्या अंगावर जाऊन नेवरा ओरडला,

" तू बी कपाळ फोडून मरतीस का ? अग, मग मी कुटं जाऊं ? "

आणि त्याला रडंच आलं. पण बायकोला नवऱ्याची कणव आली नाहीं. वरवंट्यावर डोकं आपटीत ती बोलली,

" नवरा न्हवंस तूं, वैरी हायेस माजा वैरी ! असल्या नवऱ्याची बायकू म्हणून घेण्यापरीस मी मसणवाटत बसते ! "

घटकाभर घरात एकच कालवा झाला. नाल्या नेवऱ्याच्या घरांत कुणीतरी मेलं म्हणून सगळं गाव जमा झाल. सगळ्यानीं हा तमाशा बघितला. अखेर चार जाणतीं माणस पुढं झाली आणि त्यानीं म्हातारीची समजूत घातली.

" खुळ्या काय तुमी ? फास लावून घेऊन सगळ्या गावाला कोर्टाच्या वाऱ्या करायला लावनार काय ? "

म्हातारी अंगात आल्यासारखी घुमूं लागली, " जिमिन इकली भाड्यानं. माजं वाटुळ झालं. माजं घर उठलं गावातनं. अता मी कशाला वं जगूं ! "

मग नेवरा रडत रडत गावाला सागूं लागला,

" का करूं इकू न्हाई तर ? बोजा झालाय अंगावर ! पैका आनू कुटला ? मीच मरतो ईख खाऊन म्हणजे ह्या दोघींची मनं शांत हुत्याल ! "

तशीं म्हातारी हात [illegible]ळून म्हणाली, " अरं मर की रं मर. आंघुळी करून मोकळी हुईन ! "

आणि संतापानं तिनं दांतखिळीच बसवून घेतली. दांतावर दांत घट्ट मिटून

ती निपचित पडली. मग लोकांनीं उलथनं घेतलं आणि तें दातांत घालून दांतखिळी उघडली. जवळ बसलेला नेवरा रडरडून आईला म्हणूं लागला,

"आई, तूं मरूं नगंस. अग मी जिमिन अजून इकली न्हाई. नुसती इसार पावती केलीया. ती माघारीं घिऊं, रद्द करूं. तूं सावध हो !"

म्हातारी सावध झाली. फास सोडून टाकून मंडळींनीं दोघा तिघांचा समेट केला. आणि सगळे घरोघर गेले. बायकोच्च कपाळ धुऊन नेवरानं त्यांत दगडीचा पाला भरला. दोघींनाहि अंथरुणावर निजवून जेवण स्वतः रांधलं. आपण खाल्लं आणि बायकोला, आईला घातलं.

विसार पावती रद्द करायला म्हणून नेवरा गणाकडे गेला, तेव्हा तो पंढरपूरला गेलाय आणि आठपंधरा दिवस येणार नाहीं असं कळलं !

गणा येईपर्यंत म्हातारीनं आणि बायकोन नेवराला तापल्या तव्यावर धरलं. कुठून बुद्धि झाली आणि हें पाप करून बसलों असं नेवराला झालं. आठपधरा दिवस यमयातना भोगल्यावर तो गणाकडे आला. म्हणाला,

"गणा, माजी जिमिन द्याची न्हाई !"

"का र ?"

"न्हाई द्याची हे खर. का र आन् कसं रं इचारुन काय उपेग ?"

"पर तुला हे पयलं कळत न्हवतं का ?"

नेवराचा आवाज गगनाला भिडला,

"अरं कळत हुतं मस्त ! पर माज्या घरी दोन खून पडत्याल, मी काळ्यापान्यावर जातोय जिमिन इकली तर ! का करतोस कळण्या न कळण्याला ? तू आपला इसार माघारी घे आन पावति दे !"

"आन् याज कशानं देऊं ? घर इकू माजं ?"

"याज कशाचं ?"

"मी काय पैका पुरून ठिवला हुता व्हय रं तुजी जिमिन इकत घेण्यापायी ? पंधरा घरं फिरून रुपयं गोळा करून आनलं जिमिन घेन्यापायीं. शंभरामागं छत्तीस याज अगुदरच काढून घेतलं सावकारानं, आन् आतां तू जिमिन द्याची न्हाई म्हणतूस म्हंजे मी गळ्याइतका बुडालों !"

" गणा, तुज्या पाया पडतो. माजा जीव नगं घेऊस आतां. अरं, मी माज्या मरणानं मरतोया, तू का आनी धोपाट्या घालतोस ? "

" काय करतोस असल्या मऊ बोलण्याला ? तू आपला विसार धरून पांचशें रुपये दे आन पावती ने. मला काय करायची हाय तुजी जिमिन ? "

नेवरा बहुत हातापाया पडला, पण गणा बधला नाही. मग नेवरान स्वतःच्या दहा थोबाडीत हाणून घेतल्या. रागारागान तो खोताकडे गेला आणि प्रॉमिसरी लिहून देऊन त्यान पाचशें रुपये काढले. गणाच्या मढ्यावर घातले आणि इसार पावती चुलीत घालण्यासाठीं म्हातारीच्या स्वाधीन केली !

नेवरा आता गावात फिरकत नाहीं. रानातच असतो. त्याच्या डोस्क्यावरला बोजा तसाच आहे.

—आणि बजा वाणीण आणि तिची सून याना या गोष्टीच काहींहि वाटत नाहीं !

# सोन्याची माडी

गांधीवधाच्या दंगलीत, गावातील कुळकर्ण्यांचीं आठहि घरं जळली. वाडवडिलानीं बांधलेले कडीपाट वाडे नाहींसे झाले. ब्राह्मणाचीं कुटुंबं उघड्यावर पडली. मग कुणी त्या जळक्या घरांतच पत्र्याचा आडोसा करून राहूं लागले. कुणी आपल्या रानात वस्त्या घालून तिथ राहू लागले. कुणी धर्मशाळेत, देवळात बिऱ्हाड टाकली. ब्राह्मणाची अशी दशा दशा झाली तेव्हा लोक म्हणाले,

"बामणाचीं घर उठली. आता असल्या दिवसात पुन्हा पयल्यासारख्या इमारती उभारणं ह्याच्या देवाच्यान होणार न्हाई!"

लोकाचं हे बोलणं ब्राह्मणानी ऐकल आणि ते ईर्षेला पेटले. दंगलीचा वणवा विझेपर्यंत त्यानीं दम धरला आणि मग पूर्वीपेक्षा चौपट वाडे धरले! झाडं तुटूं लागली. वडराच्या सुतक्या दगड फोडताफोडता बोथटल्या. गावचे सुतार, लोहार आणि गवंडी कामाखाली दुमते झाले. तासलेल्या लाकडाच्या ढलप्या, घडलेल्या दगडाच्या कपऱ्या याचे गावात जागजागी ढीग पडले!

कापीव लाकडाच्या सुवासान, घाणीत रगडल्या जाणाऱ्या चुन्याच्या तिखट दर्पान गाव घमघमू लागला. बामणानी चौसोपी वाडे धरले आणि हा हा म्हणता पुरेहि करीत आणले.

लोक म्हणूं लागले,

"बामणाची जात निवडुगासारखी—माळावर टाकलं तरी उगवायची!"

गावांत अशी धमाल उडाली. नवीन नवीन इमारती उठूं लागल्या. तेव्हा सोन्या साळ्यास इसाळ आला. आपल वडिलार्जित पडकं घर आतबाहेरून न्याहाळीत तो बायकोला बोलला,

"केरे, बामणानी वाडं धरलं. आपण माडी बाधू या दोनमजली!"

केरीला नवऱ्याच्या ईर्षेचं कौतुक वाटलं. गांवातल्या इतर कुणाहि पुरुषापेक्षां केरीचा नवरा सरस होता. सोलापूरसारख्या शहरगावीं राहून तो मोठा ज्ञानी झाला होता. गणा चलपत्यालाहि तो उजवा झाला असता. पण गणानं मुशाफिरी करून बक्कळ पैसा मिळविला आणि तो साठवला. सोन्यानं जें मिळवलं तें मटणमुर्गींत खर्च केल! खंक होऊन तो माघारीं आला आणि जमिनीचं एक तुकडं विकून त्यावर जगूं लागला. दावणीची एक गाय मोडून त्यानं गणा चलपत्याप्रमाणं अंगच्या दिवा असलेली सायकल आणि चार सेलवाली हातबत्तीहि घेतली होती. पिवळा हत्तीशिवाय तो काहीं ओढीत नसे. डोईवर जरीकाठी फेटा, अंगात मलमली सदरा, त्याला चादीचीं बटणं, हातात घड्याळ आणि पायांत काळे बूट. तो गावांत टेशींत फिरे. भेटेल त्याला सिगारेट देई. कुणी म्हणे,

" कशाला आमाला ही पदवी सोन्या? आपली तंबाखू आन् चिलिम दे!"

तर हा झ्याकींत उत्तर देई,

" अरं ओढ. जोपतूर हा सोन्या आहे तोपतूर सिगारेटशिवाय ओढूं नकोस! मला गड्या एकट्याला ओढू वाटत नाहीं. संगत पायजे! सोलापूरला होतो तेव्हा दारू प्यायला एकटा कधीच गेलों न्हाई. सोबत नेहमी चारदोन दोस्त मंडळी. हां!"

बाजाराला गेला म्हणजे सोन्या रंगी धनगारिणीच्या हॉटेलात बसे. गांवच्या ओढ्याला लागून तट्टे, पत्रे आणि बाबू याच्या साहाय्यानं तयार केलेलं हें हॉटेल कचऱ्याच्या ढिगासारख दिसे. धुरकटलेल्या टेबलाशीं रंगी वाणीण बसलेली असे. जाग्रणाजाग्रणानं पिवळी झालेली, चोपलेली ही बाई लाकडाच्या ढलपीसारखी होती. तिचा मागचा भाग आणि छाती अगदीं सपाट होती. विड्या ओढत आणि फाजील बोलत ती गल्ल्यावर बसे. तिची आणि सोन्याची चागली घसट होती. पाचपंचवीस रुपये उधारी करण्याइतकी पत होती. बाजारच्या दिवशीं तो मुद्दाम बाईपाशीं बोलत बसे. बाजाराला आलेले गावकरी त्याला बघत आणि एकमेकांत कुजबुजत, " सोन्या हाटेलवालीशीं लागून आहे. " आणि ही कुजबुज कानीं आली म्हणजे सोन्याला विलक्षण आनंद होई. हांका मारमारून तो गांवकऱ्यांना बोलावून घेई. बेसन लाडू,




शेवच्चिवडा, स्पेशल चहा असले अपूर्वाईचे जिन्नस त्याना खाऊ घाली. आणि मग गांवातले लोक सोन्याविषयीं फार चागल बोलत. त्याच्यासारखा अगत्यशील, उदार माणूस या प्रिढींत नाहीं असं म्हणत !

माडी बांधायची म्हणजे पैसा पाहिजे. तो आणावा कसा ? पण ही चिंता

सोन्याला पडण्यासारखी नव्हती. शेवटचं जमिनीचं तुकडं त्यानं विकायला काढलं. नाल्या नेवरासारखी जनलोक काय म्हणतील याची पर्वा करणारा तो नव्हता. नुसत्या जमिनीवर पोट भरणारा असला तर त्यान ही चिंता करावी. सोन्याला गिरणींतल्या कामाची माहिती होती. गावाबाहेर पडला तर पोटापुरतं कमावण्याची त्याची ताकत होती. त्यानं जमीन विकली! केरी कुरकुरू लागली तशीं तिची समजूत घातली, " केरे, अग आपल्याला काळजी नाही. तुजं माझं पोट भरण्याइतकी विद्या माझ्यापाशी हाय्. चार वर्षं सोलापूरला काढली तर असल्या आठ जिमिनी घेईन. तू डरतीस का? आपल्या पोटाला पोरबाळ न्हाई. काळजी कुनासाठीं करायची?"

केरी म्हणाली,

"व्हय. पर जिमिन इकून घर बांधायला इकत कुटं त्यावाचून अडल्या? आपन काय रानावनात पडलोया का? पडकं सडक का असना, पर घर हाय न्हवं?"

"हाय खर, पर माझी आपली हौस हाय्. बामणानीं वाड धरल गावांत आन् आपण गप्प बसण खर का? माझी आपली इर्षा हाय. तूं आड नको येऊस! गावात न्हाई असली फसकलास बगली उठवतो. बामणानीं नुसत टकाटका बघत रहाव!"

बायकोची अशी समजूत घालून सोन्यानं जमीन विकली आणि पैशाची पिशवी आणून घरात ठेवली. मग पटक्याला रोज एक वेगळा रंग देऊन तो गांवात हिंडूं लागला. भेटलेल्याला सांगू लागला,

" माडी उठवतो! पयलं घर पडाय आलयं. गांवात सावली पायजे. हतं कोन न्हातया खेड्यात खरं, मी जाणार सोलापूरलाच, पर गावांत घर पायजे. घ्या शिग्रेट, ओढा, पिवळा हात्ती हाय्!"

गांवाला सोन्याची ईर्षा आवडली. बामणांना शह देण्याची त्याची ईर्षा खरो-खरीच वावगी नव्हती. त्यांनीं वाडे धरले तर सोन्या दोनमजली माडी बांधायला निघाला. शाब्बास बहाद्दर!

मग सोन्या वडराकडे गेला. बोलला,

"वडरा, दगडं पाड. मी माडी धरलीया !"

बामणांच्या वाड्यांचे दगड पाडतां पाडता वडर जिकिरीला आलं होतं. तें म्हणालं,

"नाय् रे पाटला. आता माज्या देवाच्यान् व्हनार न्हाई. बामनांची कामं व्हऊदेत, मंग तुज बगंन !"

पण सोन्यानं ऐकलं नाहीं. चारपाच रुपये टाकून कोंबडी आणली आणि केरीकडून झकास बनवली. सध्याकाळीं वडराला घरीं बोलावून चारली. चपात्या आणि कोंबडी खाऊन वडर टम् फुगल तेव्हा त्याला गळ घातली,

"वडरा, दगड पाड. बामणानी दिलं त्यापरिस चार रुपयं आगाव घे, पर दगडं पाड !"

वडरानं आणखी थोडे आढेवेढे घेतले आणि मूळ दामापेक्षा दीडपट रक्कम कबूल करून सौदा पटला. लगोलग सोन्यानं पंचवीसभर रुपये विसार त्याला देऊन टाकला.

वडर कामाला लागल्यावर सोन्या इमारतीच्या कामासाटीं बाभळीलिंबाचीं झाडं शोधीत सगळे मळेखळे हिंडला. पण बामणाच्या आट वाड्यानीं बहुत झाडं खाल्लीं होतीं. सोन्याच्या वाट्याला झाड राहिलं नव्हत. मग सायकलीवर टांग टाकून तो आसपासच्या वाड्या हिंडला. सायकलीवर आलेला, रंगीत पटका बांधलेला आणि हातात घड्याळ असलेला हा माणूस बघितल्यावर झाडाच्या मालकानीं दर वाढवले. सोन्यानं ते घासाघीस न करता दिले. रोजगारी लावून झाडं तोडलीं आणि भाड्याच्या गाड्या करून गावी आणली. ईर्षेनंच सगळं करायच म्हटल्यावर काय ? गांवातले सुतार गुतले होते तेव्हा त्यानं जबर दाम देऊन तालुक्याचे सुतार बोलावले. गवंडी दगड घडूं लागले. सुतार लाकडं कापूं लागले. सोन्याची माडी बांधली जाऊं लागली.

महिना गेला. दोन महिने गेले. सहा महिने गेले. माडी पुरी झाली नाहीं. गवंडी, सुतार, वडर सगळ्यानींच नाशिकच्या न्हाव्याप्रमाण केलं ! चार दगडं काढल्यासारखीं करून वडर नाहीसा झाला. चार फाडी घडल्यासारख्या करून गवंडी दुसऱ्या कामाला लागला. चार लाकडं तासल्यासारखीं केली आणि

सुतारहि परागंदा झाला. सगळ्यांनीं कामाचे आगाऊ पैसे मात्र सोन्याकडून खुबीनें वसूल करून घेतले होते. आणि मोठेपणाच्या झ्याकींत येड्या सोन्यानं ते दिले होते !

दर दोन दिसांनीं सुतार यायचा आणि काकुळती येऊन बोलायचा,

" मालक, घरात आन्न न्हाई. पैशे थोडं द्याल तर उपकार व्हत्याल ! "

" लेका, काम अजून रुपायातलं चार आणे झाल न्हाई आन् पैशे तेवढं सगळं मागता का ? "

" कामाची तुमाला का काळजी ? बघा तर, चार दिसात सगळं हाणतो !"

मग सोन्या पाघळायचा आणि पैसे काढून द्यायचा. ते कनवटीला लावून सुतार परागंदा व्हायचा.

गवंड्यानं नऊ कामं एकाच वेळीं घेतलेलीं. सोन्यानं फार शिव्या दिल्या म्हणजे तो यायचा, एखादा थर चढवायचा आणि नाहींसा व्हायचा. सोन्याला झीट आली ! फळ्या पाड रे, खिळेमोळे आण रे, दगडं घड रे, नाना व्याप ! गवंड्याच्या मनांतून काम करायचं नसेल तर तो एखादा तळखडा, एखादी कोपरी घडतांना हातोडीचा ठोका असा हाणायचा कीं दगड फुटावा. मग त्याविना काम अडे. पुन्हा वडर, पुन्हा दगडाची खाण, ती आणायला गाड्या ! अशा झिंबड्या मारता मारता जवळची रक्कम केव्हांच उठून गेली. दावणीची दुसरी गाय गेली. केरीच्या अंगावरचे डाग आणि स्वतःच्या हातातली अंगठी गेली, तरीहि माडी पुरी झाली नाहीं ! पण सोन्या पक्का जिद्दीला पेटला होता. ईर्षेला पडला होता. त्यानं पुन्हा हजार बारारों कर्ज काढलं, दुसरे गवंडी आणि सुतार लावले आणि स्वतः देखरेख करून माडी पुरी केली ! अखेर सोन्याची माडी उठली !

वास्तुशांति झाली. केरीला घेऊन सोन्या नव्या माडींत राहूं लागला. आल्यागेल्याला बोलावून सिगारेट, विडीकाडी देऊं लागला. माडीवर बसून सारं गाव बघू लागला !

महिना पंधरा दिवस झाल्यावर सोन्या उठला आणि गबा वाणिणीच्या दुकानीं गेला. शाईची पुडी, बोरू, कोरा कागद घेऊन बसला. आणि जाड, ढोबळ अक्षरांत लिहिलेली पाटी त्यानं नव्या माडीवर लावून टाकली.

'माडी विकने आहे!'

ही पाटी गणा चलपत्यानं वाचली आणि साऱ्या गावांत बभ्रा झाला. लोक विचारू लागले,

"लेका सोन्या, घर रे कशापायी इकतोस?"

सोन्या बोल्ला,

"तें बाधण्यापायी झालेल कर्ज कशानं बरं फेडूं? माडी विकतो आणि लोकाचं देणं भागवतो. मोकळा होतो!"

"गाढवीच्या, मग बाधलीस कशापायीं इकता आटापिटा करून?"

"हौसंला मोल न्हाई! आन् जरी ही माडी कुणी इकत घेतली तरी तुम्ही तिला म्हणाल कुणाची? सोन्या साळ्याची माडी म्हणूनच वळखाल न्हव? मग? पिढ्यान् पिढ्या माझं नाव राहील का न्हाई गावात?"

# झोंबी

हसन मोमिनाचीं दोन पोर मुबईला राहून अंड्याचा व्यापार करीत होतीं. गांवांत मोमिनाचं तेवढं एकच घर होतं. हसन नुकताच मेला होता आणि त्याची म्हातारी आई तिसऱ्या पोराच्या हातीं घर सोपवून निवात रहात होती. मुंबईला कमावलेल्या पैक्यावर पोरानीं जमिनी घेऊन टाकल्या होत्या. त्यातली एक जमीन बाबू म्हातऱ्याच्या रंडक्या भावजयीची होती. भावजयीनं आपली जमीन मोमिनाला विकली, आपल्याला दिली नाहीं, हा राग बाबूच्या पोटात फार दिवसापासून होता. वयानं थकलेला हा माणूस अंगापिंडानं बैलासारखा बाधला गेला होता. त्याचं डोकं, तोंड शरीराच्या मानानं ल्हान होतं. खादे गाडीच्या जुवासारखे रुंद होते आणि माडीखाली पाय बारीक होते. त्याचं वागणं वरून दिसायला शाळामास्तरासारखं मवाळ, नम्रतेचं असे. पण तें सगळं खोट ! बिघडला म्हणजे तो भारी उर्मट आणि रागीट बोले. त्याच्या जबड्यातले खालचे दांत जीभ थटवली कीं जागचे हलत. त्यांचीं मुळं सुटली असावींत; पण ते धड पडलेहि नव्हते. त्यामुळं बाबूचं बोलणं बोबडं येई ! सगळ्या गावात मारकीं म्हणून म्हाजूर असलेली त्याचीं बैलं मालकाचं रागीट बोलणं ऐकतांच थरथर कापत आणि भीतीनं तोंडं वासत.

बंडा नावाच्या आपल्या धाकट्या पोराला बाबूनं खारीकखोबरं चारून आणि रतीबाचं दूध पाजून चांगला तयार केला होता. आपल्या माघारीं या पोरानं गावात वचक बसविला पाहिजे, त्याला बघताच वाघानं लेंडी टाकायला पाहिजे, अशी बाबूची इच्छा होती. पोलादाच्या कांबीसारखा देह कमावलेला हा पोरगा सुरेख झोंबी खेळे. गावात त्याला जोड नव्हती. शेतीभातीचं काम करून तो तालीम द्याणी. गेरूनं अंग रगवून तांबडं भडक करी आणि संध्याकाळीं गावओढ्याच्या वाळूंत बरोबरीच्या पोरावर भुजा ठोकी !



एकदा हसनचीं पोरं मुंबईहून गावाकडे आली तेव्हा लासगांवचा मेहमान त्यांना आढळायला आला. मोमिनाच्या पोराची बहीण त्याला दिली होती. संध्याकाळच्या वेळीं मेहमानाला घेऊन दोन्ही पोरं मळ्याला गेलीं. आणि परत येतांना ओढ्याच्या वाळूत उभा राहून भुजा ठोकतांना त्यांनीं बाबूच्या

बंडाला बघितला. मावळत्या दिवसाच्या उजेडान बडाचं अंग तापल्या लोखंडा-सारखं दिसत होत.

मेहमान म्हणाला,

"रसूल, किसका छोकरा रे ओ?"

"बाबू पटेलका."

"अच्छा लढनेवाला हाय क्या?"

"हा तो! अरे यार, गावमें जोड नही उसको!"

हें ऐकून मेहमानाच्या भुजा स्फुरू लागल्या. तोहि खेळणारा होता. बकऱ्याचं घोस खाऊन त्यानंहि ताकत कमावली होती. वाळूंत उतरून तो बड्यापाशीं आला आणि त्यान शब्द टाकला,

"हमारे साथ लढेंगे क्या पटेल?"

कपाळावरचा घाम बोटान निरपून बंडानं या नव्या वस्तादाला पायापासून डोक्यापर्यंत न्याहाळला. चौकस्याचौकस्याची लुंगी, अंगात पातळ मलमली खमीस, वर झोकदार पटका. कान मुडपलेले. गळ्यात ताईत. मनगटात गडा.

कमरेला रुतणारी लाग बोटानं सैल करीत बंडानं दमात विचारलं,

"अरं कोन रं ह्यो?"

मुंबईचा पोरगा पुढ झाला आणि म्हणाला,

" मेहमान हाय लासगावचा. आमौघरीं आलाय आढळायला. आमची भन दिलीया हेला!"

पुन्हा एकवार बडानं पाव्हण्याचा अदमास घेतला आणि वाळू उचलून घेत तो म्हणाला,

"काढ कापड. खेळूं दोन डाव!"

पाव्हण्यान लुंगी सोडली. खमीस काढला. खोबरेल तेल जिरवलेलं त्याचं अंग शिसवी लाकडासारख होत. दंडाच्या बेडक्या टरारून आल्या होत्या आणि माडीचा पट पडले होते.

गावचीं पोरं चौफेर जमा झालीं. झोबी जिद्दीची होती. गडी सारख्याला

वारखा घावला होता. आणि ही कुस्ती मारतांच बंडाचं नाव लासगावच्या तालिमीपर्यंत जाणार होतं. आपलीं उतरून ठेवलेली कापडं घेऊन बसलेल्या पोराच्या कानात बंडा म्हणाला,

" हाड मोडून हातात देतो पाव्हण्याच्या ! "

पण सलामी झाली आणि सटक्यासरशीं पाव्हणा बंडाच्या पाठीशीं आला. मुरगळा मारून त्यानं बंडाला खालीं गुडघ्यावर आणला. जमिनीबरोबर चेपला. ताकतीनं भारी असलेल्या पाव्हण्यान बंडाला नुसता चेपूनच गार केला. वाळूत बेदम घोळमला. केसात, तोंडात, नाकात वाळू जाऊन बंडा घाबरा झाला. वाळूचे जाडे खडे बोचून त्याच्या गुढघ्याचीं साल निघालीं. तरी तो नेटानं उठून गुढघ्यावर आला आणि पाठीवर ज्वारीच्या पोत्यासारखा बसलेल्या लासगावच्या पाव्हण्याला बाजूला फेकण्यासाठीं धडपडूं लागला. पण त्यानं वाळूंत टेकलेल्या बंडाच्या हाताला खुब्यापाशीं दणका दिला आणि काय झाल कळायच्या आतच बंडाची पाट लागली ! पाव्हणा उठला आणि काड्कन् भुजा ठोकून ओरडला, " अल्लेक ! चीत हो गया साला ! "

त्यासरशीं बंडा चवताळून उठला आणि पाव्हण्याच्या अंगावर झेप घेऊन म्हणाला,

" कुणाला साला म्हणतोस र भडव्या ? "

मोमिनाच्या दोन्ही पोरानीं त्याला दाबून धरला आणि ते म्हणाले,

" पटेल, मारामारी करायची न्हाई. जितीच्या कैफात पाव्हणा बोलू नये ते बोलला. त्यापायीं आमी तुमची माफी मागतो. "

पण बंडा जाळ्यातल्या माशासारखा उसळ्या घेऊ लागला. तेव्हा मोमिनाचा पोरगा पाव्हण्यावर ओरडला,

" तुम भागो यार घरको. देखते किव् ? बस हो गया मिजाशी ! "

आणि लुंगी खमीस उचलून पाव्हणा घराकडे गेला.

बंडा रागान वेडा झाला. परगावच्या एका पाव्हण्यानं आपल्याला पालथा घालावं म्हणजे गोष्ट काय ? आणि वर पुन्हा शिवी हासडावी ? त्याची जीभ उपटून हातात देईन !

मोमिनाचीं पोरं हातापायां पडलीं तेव्हां बंडानं कपडे काखोटीला मारले आणि खाली मान घालून तो रानात गेला. लिंबाच्या सावलीला उगीच बसला आणि डोकं निवाल्यावर परत आपल्या रानातल्या वस्तीवर आला.

दरम्यान बाबूला हा प्रकार समजला होता. आपल्या पोरानं मोमिनाच्या पाव्हण्याकडून माती खाल्ली ही गोष्ट त्याला बहुत शरमेची वाटली. रात्रीं उघडावाघडा, रानातल्या कामान शिणलेला असा तो घरीं आला, तेव्हां शरमलेला पोरगा बैलाना वैरण घालत असलेला त्यानं बघितला. बाबू पोरापाशीं जाऊन ताठ उभा राहिला आणि कणखर शब्दात बोलला,

"लेका, बापाला मान खालीं घालायला लावलीस. मोमिनाखालीं पडलास. आजपतूरचं माझं खारिकखोबरं अन् दूध फुकट फुकट गेलं. थूत् तुज्या तोंडावर!"

पोराला असं बोलून झाल्यावर, न जेवतां खातां बाबू गांवांत आला. अंधारातून हातातला कंदील हलवीत आला आणि मारुतीच्या देवळाच्या पायरीवर येऊन बसला. येणाऱ्याजाणाऱ्यांनीं त्याला तसा बसलेला बघितला आणि वासपुस केली,

"का बसलाय बाबूराव?"

तेव्हा बाबू नीट बोललाच नाहीं. नेहमीं लीनतेनं देवा, महाराजा अस गांवकऱ्याना संबोधणारा, हात जोडून घवघवीत रामराम घालणारा बाबू चेहरा निबर करून बोललाच नाही. उघडी छाती चोळीत बसून राहिला. तेव्हां त्याच बिनसलं आहे हे गावकऱ्यानीं ताडलं आणि मोमिनाच्यात येऊन वर्दी दिली,

"संबाळा रं मोमिनानू, बाबू म्हातऱ्या बिघडलाय्. तुमची काय धडगत न्हाई आता लेकानू!"

बाबू म्हातऱ्या बिघडलाय् म्हणजे सगळं गावच बिघडलय्! कारण त्याचा गोतावळा बक्कळ होता. तरणीं आणि हिरवट टाळक्याचीं पाचपंचवीस पोरं एका दिलान बाबूच्या मागं होतीं. त्याच्या हाकेला ओ देणारीं होतीं.

गांवकऱ्यांनी सांगितलेली ही बातमी ऐकून लासगांवचा मेहमान मग्रुरीनं बोलला,

" बिघड गया तो क्या होगा? हमारा घर तो गांवमेसे नही निकलता ?"

पाव्हण्याचे हे मग्रुरीचे बोल ऐकून मोमिनाची म्हातारी थरथर कांपत पोरावर ओरडली,

" अरं जा तो. उसका पाव पड. अब क्या होगा गे मेरी मा? अब क्या हो रे अल्ला!"

गावात अनेक वर्षे राहिलेली, स्वतः रचलेलीं रामायणावरील गाणीं म्हणत मराठ्यांच्या बायकांतून फेर धरून नाचणारी ती म्हातारी इतकी काकुळती आली, घाबरली कीं तिला रडूंच आल! वरचेवर ऊर बडवीत ती या दारा-पासून त्या दारापर्यंत येरझाऱ्या मारूं लागली. पोरांना प्रसंगाची गंभीरता कळली. मुंबईला राहून तीं थोडीं फार धीट झाली होतीं. तरी एकुलतं एकच मोमिनाचं घर असलेल्या या गांवातले मराठे जर बिघडले तर कोंबडी-सारख्या आपल्या माना मुरगळतील अशी त्याची खात्री होती. तरी त्यांतला थोरला पोरगा म्हातारीवर खेकसला,

" तू चूप बठ गे! हम देखेगे क्या होता है!"

आणि बाबू म्हातऱ्याची समजूत घालण्यासाठीं तो देवळाकडे निघाला. म्हातारीनं त्याला पुन्हा पुन्हां बजावल,

" कुछ उलटा सबूद ना कर मेरे बाबा. उसके पाव पकड. बोल, हमारी गलती दुई. हा बाबा, ख्याल मे आया क्या ?"

म्हातारीचे शब्द ध्यानात घेऊन हसन मोमिनाचा थोरला पोरगा जलदीनं देवळापुढं आला. तिथ दुसरं कोणी नव्हत. कंदील पायरीवर ठेवून बाबू म्हातऱ्या गप बसला होता.

मोमिनाचा पोरगा पुढं झाला आणि ओठावरून जीभ फिरवीत बोलला,

" पटेल, मी पाया पडतो—"

पण त्याचं पुढचं बोलणं बाबून ऐकूनच घेतलं नाहीं. तो सटक्यानं पाया-तली जाड वहाण उपसून उठला आणि मोमिनाच्या पोराला त्यानं रानात निघालेल्या काळ्या विंचवासारखा ठेचला. वहाणेचे खिळे, नाल नाकावर, तोंडावर, डोक्यात बसून तो फुलल्या पळसासारखा दिसूं लागला, खाटकाच्या

हातांतल्या कोंबड्यासारखा तडफडून केकाटूं लागला, तरी बाबूचं हाणणं थांबलं नाहीं. शेवटीं हिकमतीनं सुटका करून तें पोरगं केकाटत धूम पळालं तेव्हा, "थूत् तुज्या मोमिनाच्या हो!" अस म्हणून तो पचकन् थुकला आणि पालथ्या हातान ओठावरची थुकी पुसून चालूं लागला. मळ्याच्या निर्जन वाटेनं तो दूर गेला तेव्हा त्याच अंग काळोखात दिसेनासं झालं आणि हातातला कंदीलच तेवढा भुताच्या दिवटीसारखा अंधांतरीं जात राहिला.

त्या दिवशीं मोमिनाच्या घरात रडारड झाली. मोमिनाचा धाकटा पोरगा पाव्हण्याला वाटेल तसं टाकून बोलला तेव्हा तो सासुरवाडींतलं पाणीसुद्धा तोंडात न घालतां पायींपायींच लासगांवला चालता झाला. जावई असा रागेजून निघून गेला, आता माझ्या पोरीची धडगत नाहीं, म्हणून म्हातारी पोरावर कावली. कडदरली.

बाबू म्हातऱ्याच्या मारानं पोरानी अशी भीति घेतली कीं शेतीभाती, घर-दार विकून तीं मुंबईला जायची तयारी करूं लागलीं आहेत. पण त्याची इस्टेट विकत घ्यायला गावातल कुत्रदेखील तयार नाही! बाबू म्हणतो,

"कोन त्या हलकटाच्या जिमिनीला पैका मोजतय? जाऊ दे कीं बोंबलत गाव सोडून. ती इस्टेट आपलीच हाय्. वाईट मोमिन! तसलं बीज नको आपल्या गावात!"

आता मोमिनाच्या पोरानीं काय करावं?

# करणी

पहाटेची चादणी उगवली तेव्हा न्हाव्याची म्हातारी जागी झाली. अंथरुणावर उठून बसली आणि शेजारीं झोपलेल्या आपल्या नातीला जागी करू लागली,

"उठ ग माझ्या बाई. पायलीभर दळायच हाय!"

नात वयांत आली होती. न्हाती धुती झाली होती. त्यामुळं तिला अलीकडे झोंप फार येई. जेव्हा तेव्हा ती अंगाचं मुटकुळं करून कुठल्यातरी कोपऱ्यात झोंपून राही. अंगावरच्या लुगड्याचं भानदेखील तिला त्या झोपेत रहात नसे. त्याबद्दल आजी आणि आई तिला बोल बोल बोलत. पण तिला काही झोप आवरत नसे. म्हातारीनं आपल्या जीर्ण हातानं गदगदा हलवल, तेव्हा कोंडीची झोप थोडीफार चाळवली. तिच्या छातीवरचा पदर नीट करीत म्हातारी पुन्हां म्हणाली,

"ऊठ ऊट. मला जात ओढूं लाग. पुरं झाली झोप!"

अंगाला आळोखेपिळोखे देत कोंडी जागी झाली. उठून बसली. झोंपेची धुंदी डोळ्यावरून उतरली तशीं तिला जाणवल कीं, आपल डोक फार हलकं हलकं वाटतय. आणि साहजिकच तिचा हात आपल्या केसाकडे गेला. तर जागेवर अंबाडा नव्हता! त्यासरशीं ती गोंधळली. म्हातारीनं दिवा लावला होता आणि ती जात्याशेजारीं गेली होती. तिला ओरडून म्हणाली,

"आजे, माझा अंबाडा कुठाय्?"

नातीच्या प्रश्नाचा अर्थच म्हातारीला लागेना. अंबाडा कुठाय् म्हणजे काय? हातांतला दिवा वर करून तिन आश्चर्यानं कोंडीकडे बघितल. या वेळपर्यंत पोरीन डोकं चाचपून बघितल होत. ते भुंड आढळलं तेव्हा ती किंचाळली,

"आजे, माझं केस कुणी कापलं ग?"

हातात दिवा घेऊन वाकलेल्या पाठीनं म्हातारी नातीच्या अंथरुणापाशीं आली. आणि तिच्या पायाला केसांचा थंडगार, मऊसूत जुडगा लागला. ती खाली बसली आणि थरथरत्या हातान तो उचलून न्याहळूं लागली. नातीचे केस तिच्या हातांत होते ! अंबाड्याचा वेढा तसाच होता. आदल्या दिवशीं लावलेलं तेल तसच होतं, खोचलेलं फूलहि होतं. सफाईदार हातानं कात्रीचा छाट मारावा तसे केस डोक्यापासून वेगळे झाले होते. तो जुडगा हातात गच धरून म्हातारीनं पोरीचं डोकं बघितलं. सोवळ्या बामणिणीच्या वाढलेल्या डोक्यासारखं तें दिसत होतं. असे केस रात्रींतून कसे कापले गेले ? कुणी दुष्टानं पोरीला विद्रूप केली ?

रागानं लटलट कापत म्हातारी उठली. भिंतीच्या पलीकडे वेगळी चूल करून राहिलेल्या आपल्या धाकट्या लेकाच्या घरात शिरली. बंद खोलीवर थाप टाकून ओरडली,

" बापू, बापू, ऊठ. तुझ्या बायकोची कसाबकरणी बघ ! "

बापू उठला. धोतर आवळीत बाहेर आला. म्हणाला,

"काय झालं ग आये ?"

"अरं तुझ्या बायकोला विहरींत कां ढकलून देत न्हाईस ? तिचा जीव का घेत न्हाईस ?"

"अग पर का झालं ?"

"ह्या तुझ्या बायकोनं एकाच्या दोन चुली केल्या. मधीं भिंत घातली, आन् आज रात्रीं येऊन दावा साधला. माझ्या नातीच केस कात्रीनं कापून तिला हेंगाडी केली. का ग अस ? हा ?"

"कुनाचं ? कोंडीचं केस कापलं, माझ्या बायकोनं ?"

दरम्यान कोंडीहि येऊन उभी राहिली होती. तिला पुढं करून म्हातारी म्हणाली,

"बघ बघ, कशी दशा केली पोरीची. आईयेगळ्या पोरीला अशी केली. का ग ? का म्हणते मी ? गरीब लेकरानं तुझं काय केलंय् ?"

तोंडाला पदर लावून कोंडी बारीक रडूं लागली. बापू तिला समजावूं लागला.



इतका वेळ अंथरुणाच्या गळाठ्यात लोळत असलेली बापूची बायको बाहेर आली. बुटकी, काळी आणि दात पुढं असलेली. लोळण्यामुळ तिचे केस विस्कटले होते. रात्रीं झोपताना काढून ठेवलेली चोळी न घालताच, आडव लावलेलं लुगड्याच फडक अंगावर तसच ठेवून ती वसकन बाहेर आली. कर्कश आवाजांत बोलली,

“का झालं व सासुबाय?”

बापूनं तिच्या पेकाटांत पकून् एक लाथ घातली.

“राड, पोरीचं केस तू रातीतून कापलंस. तुला का म्हणावं?”

लाथेसरशीं तडमडलेल्या बापूच्या बायकोनं स्वतःला सावरलं आणि गहिंवर घातला,

“मेले मेले रं देवा! अवं मी का केलया? मला का मारता?”

म्हातारी तिच्यापुढं होऊन म्हणाली,

“कशी वरडतीया बघ गत्काळी! हाण हाण बापू. मारुन कुट्टा केल्याशिवाय तिची खोड जिरणार न्हाई!”

पण बापून हात उगारायच्या आतच ती सटक्यान खालीं बसली. खांबाच्या तळखड्यावर तिनं आपलं डोकं ताडताड आपटून घेतलं. रक्तबंबाळ करून घेतलं. आणि रडरडून ती म्हणूं लागली,

“मी माझ्या लेकराच्या डोक्यावर हात मारुन सांगते, मी खंडोबाची पायरी शिवून सांगते, कोंडीच्या केसाना मी हात लावला न्हाई. माझ्यावर आळ काय म्हणून घेता? मला फुकाफुकी का मारता?”

आईच्या आरडाओरडीन बापूचीं पोरं जागीं झाली आणि गळा काढून रडूं लागली. घाबरून किंचाळू लागली. त्याना समजावीत म्हातारी सुनेवर ओरडली,

“गप. वरडू नगस गुरावाणी. पोरं भ्याली. बाईचा आवाज तरी काय हल्का हाय? सगळ गाव जमा करल. गत्काळी राड!”

हा गोंधळ चालला आहे तोंच आतल्या माळींतून धडधड आवाज आला.

म्हातारी म्हणाली,

“बापू, माळींत जा. काय पडलं बघ. मांजर उलथलं असेल!”

बापू गेला आणि बघूं लागला. कोपऱ्यात रचलेल्या सगळया उतरंडी ढासळल्या होत्या. फुटक्या गाडग्यांचे तुकडे चौफेर झाले होते. धान्यधुन्य, मीठ, आणि साठवणीचं सटरफटर चहुकडे उधळल गेलं होतं. उतरंडी कशा ढासळल्या? मांजर नाहीं का घूस नाहीं. आणि जडशीळ रांजण कसे कलंडले? बापू

गोंधळला. त्याला कांहीं उमज पडेना. म्हातारी स्वतः आली आणि तो सत्या-नाश बघून कळवळली. बापूला म्हणाली,

"बघतोस काय ? हे गोळा कर !"

तोंवर माचोळीवर एकावर एक रचलेल्या पोत्यातील मधलंच पोतं पेटलं. जळलेल्या जोंधळ्याचा करपा वास आणि धूर घरात पसरू लागला. मधलंच पोतं कसं पेटलं? हा काय चमत्कार झाला? धूर बघून लोक पळत आले आणि पाणी मारून पोतं विझवू लागले. पण तोंपर्यंत कापड भरून ठेवलेल्या बंद ट्रंकेंतून धूर निघूं लागला. सारे भारी कपडे पेटले. नकीर्ची धोतर, जरीचे फेटे, खण, लुगडीं आणि रेशमी कुऱ्या—आणि विझवायच्या आत जळूनहि गेले !

ही विलक्षण बातमी तोंडातोंडी साऱ्या गावात झाली. रानामाळात जायचं सोडून लोक न्हाव्याच्या घराभोंवतीं जमा झाले.

हवालदिल होऊन बापू न्हावी ओसरीवर बसला होता. घरात पाणी साडलं होतं. जळके कपडे, धान्य, खापराचे तुकडे याचा खच झाला होता. न्हाव्यांच्या घरावर मोठा कठीण प्रसंग आला होता. आणि अशा वेळीं सहानुभूती दाख-विणं हे गावकऱ्याचं एक आवश्यक कर्तव्य होतं.

जी ती आईबाई येई आणि कोडीचं भुंड डोकं बघून हळहळे,

"अग आई आई ! पोरीच्या रुपाचं बेरुप झालं. कुणी द्वाडानं करणी केली काय वं ?"

जो तो दादाआप्पा येई आणि फुटलेल्या उतरडी, जळकीं पोतीं, कपडे बघून चुकचुके,

"अरारा, सगळा इस्कूट झाला की हो घरात ! च्या बायलीला ! कुणी करणीबिरणी केली काय बर !"

दिवस बराच वर आला तरी न्हाव्याच्या घरीं रोजचे व्यवहार घडले नाहींत. डोकीं करायला आलेले लोक तसेच परत गेले. दावणीची म्हैस वैरणीवाचून, धारेची राहिली. शेरड करडं नाचून ओरडूं लागली. चूल पेटली गेली नाहीं कीं केर काढला गेला नाहीं. सारी मंडळी हवालदिल होऊन गेली.

दुपारच्या सुमारास कांखेत धोकटी अडकवून बापूचा थोरला भाऊ बंडा

गांवाहून माघारीं आला. म्हातारीनं रडरडून त्याला तपशीलवार हकिगत सांगितली. घरांत झालेला सत्यानाश दाखविला.

" बघ, बघ. लोक बोलयात कुणी करणी केली. आता काय करायचं रं माझ्या बाबा ? आता व्हायाचं कसं ? "

बंडा मोठा धीराचा माणूस होता. जवानींत असताना त्यानं कुस्त्या हाणल्या होत्या. सगळ्या तालुक्यांत तो म्हाजूर होता. गावात आणि गांवाखालीं असलेल्या वाड्यावस्त्यांवर मिळून त्याची हजारबारशेंची सावकारी होती. न्हावी मोठा गबर होता. त्याचीं दोन जाणती पोरं मुबईला सलूनांत काम करीत होतीं. बंडा घरातला कर्ता माणूस होता. तें सहन न होऊन बापूची बायको त्याच्या नावानं सदोदित जळत होती. भाडून भाडून तिनं वेगळी चूल मांडली होती. तरी प्रपंच अद्याप एकच होता. पाऊणशेंच्या घरांत आलेली म्हातारीच सगळा घरप्रपंच संभाळीत होती. सुनानां आपल्या हातानं रोजचा शिधा देत होती. दूधदुभत्याचा हिशेबठिशेब ठेवीत होती. आणि पोराना स्वतः भाकरी वाढत होती.

धोकटी खुटीला अडकवून बंडा शातपणानं आईला म्हणाला, " बरं हं. आवर. पसारा का पडलाय घरात ? दिवस डोईवर आला तरी चूल पेटली नाहीं घरात ? कोंडे, म्हस सोड. हिंडवून आण जा रानातन. उठ र बापू. कां बसलास टकुरं धरुन ? पोरखेळ सगळा ! आंवर पसारा. "

बंडाच्या या बोलण्यानं सगळ्याना धीर आला. फुटलेल्या उतरंडीच्या खापऱ्या गोळा झाल्या. जळकं पोतं, राख उकीरड्यावर पडली. चूल पेटली. धार निघाली. न्हाव्याच्या घरांतले सगळे व्यवहार पूर्वींसारखे चालू झाले. सुनेला उगीच दोष दिल्याबद्दल म्हातारीनं स्वतःला बोल लावून घेतले. घरांतून आंत बाहेर करता करता ती स्वतःशीं बडबडूं लागली,

" काय बाई तरी तऱ्हा. मला कळतय् असं घरीं असली पीडा झाली नव्हती. मी उगीचच सुनंला बोलले. उगीचच. तिच्याकडं काय न्हाई. कुणी तरी करणी केली. दावा साधला ! "

ती अशी बडबडते आहे, बापू गिऱ्हाईकाची दाढी करतो आहे, बंडा घरांतलीं प्रॉमेसरी नोटाचीं पुडकीं बंदोबस्तानं ठेवण्याच्या नादांत आहे, बापूची

बायको पोर पाजीत बसली आहे, तोंच घराच्या अंगणांत एक बचकेसारखा दगड येऊन दाणकन पडला. पडला आणि त्याच्या मागोमाग भिरीरी दगड येऊं लागले. दारावर, भिंतीवर थडाथड थडकूं लागले. अंगणांत बांधलेलं रेडकूं एका दगडासरशीं पटकन् खाली पडल आणि पाय झाडूं लागलं. आडो-शाला ठेवलेल्या हंड्यावर एक धबका बसला. ठाण्कन् आवाज झाला. आत बसलेली म्हातारी भीतीनं वीतभर उडाली. आणि हंड्याला केवढा तरी पोचा आला. मग म्हातारी रडूं लागली. घाबरून थरथर कापूं लागली. बापूच्या पोराना कवटाळूं लागली. एकच रडारड झाली. बंडा सर्वांवर ओरडला,

" रडायला का बा मेला का तुमचा ? गप् बसा आत जाऊन. खबरदार कुणी तोंडातनं आवाज काढला तर ! "

म्हातारी रड आवरून म्हणाली,

" बंडा, माझ्या लेकरा, आता धडगत न्हाई रं ! आतां सगळा सत्यानास होतुया रं ! अर माझ्या देवा, अग आई ग ! "

" काय होत न्हाई आन जात न्हाई—" आवाज चढवून बंडानं म्हातारीला दटावल, " तूं निवांत बस. आमचं आम्ही बघून घेतो ! "

घरातल्या सगळ्या माणसाना माळींत बंद करून बंडा एकटा सोप्यात राहिला. आणि येणारे धोंडे लक्षपूर्वक बघूं लागला. पण ते कसे आणि कुठून येतात हें त्याला कळलं नाहीं. तिसरा प्रहरपर्यंत हा प्रकार चालला. न्हाव्याच्या घरात तोंपर्यंत कुणाच्या पोटांत अन्नाचा कण गेला नाहीं. अखेर जेव्हां धोंडेफेक बंद झाली, तेव्हा मंडळी भाकरी खायला बसली. बंडानं भाकरीचा तुकडा मोडून तोंडात घातला आणि तो संतापला,

" भाकरी पिठाच्या केल्यात का राखेच्या ? "

पण बंडाखेरीज सगळ्यांना भाकरीची चव वेगळी लागली नाहीं. तेव्हां बापूच्या पानातला तुकडा घेऊन बंडानं तोंडांत घातला. थू थू थू, त्यालाहि तीच चव ! तोंडांत घास न घालतांच बंडा उठला आणि म्हातारीला म्हणाला, " मी जाऊन येतो. बापू, भिऊं नकोस. मी बदोबस्त करून येतो."

आणि धोतर खाकेला मारून तो चार पांच मैलांवर असलेल्या वाडीकडे निघाला. त्याला आतां या प्रकाराची शहानिशा करायची होती. हा चावटपणा

कुणी केलाय, हे त्यानं बरोबर ताडलं होतं. तरतरा रस्ता चालून तो वाडींत आला. आला तसा धोंडी लेंगऱ्याच्या घरांत शिरला. भिंतीला टेकून बसून धोंडी गांजा ओढत होता. त्याला बोलला,

" धोंडी, हा तमाशा बंद कर ! "

" कसला तमाशा ? "

" तुझ्याजवळ पित्रं हायेत, ती तू माझ्या घरावर सोडलीस ! "

" काय कारन ? "

" माझं देण तूं लागत होतास. त्याच्या व्याजात मी तुझी जिमिन घेतली. तो राग तुझ्या पोटात हाय ! "

" न्हाव्या, तुला उशीरा कळलं. पन्नास रुपयाच्या कर्जापायी तूं माझी हजार रुपयाची जिमिन बळकावलीस ! "

" तूं वेळेवर मुद्दल दिलं न्हाईस. व्याज वाढलं. जिमिन गेल्यावर का बोंबलतोस ? "

" मी न्हाई. बोंबलायची पाळी आता तुला आलीया ! "

" धोंड्या, बऱ्या बोलानं पित्रं माघारीं बोलाव ! "

" ती आतां माझं ऐकणार न्हाईत. ती आता खवळलीत ! "

तांबारलेल्या डोळ्यानीं लेंगरा बंडाकडे रखारखा बघूं लागला. त्याच्या निबर अंगावरच्या शिरा टरारून फुगल्या होत्या. भिंतीला टेकून बसल्यामुळं उघडी पाठ आणि हाताचं ढोपर पाढऱ्या मातीनं मळलं होतं. केसाचं जजाळ अंगावर असलेला धोंडी एखाद्या जगली जनावरासारखा न्हाव्याकडे बघत होता.

मग न्हावीहि रागानं हिरवापिवळा झाला. म्हणाला,

" लेंगऱ्या, मी तुझा जीव घीन. फासावर गेलों तरी बेहत्तर ! "

" त्या अगुदर माझी पित्रं तुझा जीव घेतील. गुर्मीत मरूं नगंस. माझी जिमिन माघारी दे ! "

" न्हाई देणार. तुला का करायच हाय ते कर ! "

निर्वाणीचं उत्तर देऊन बंडा बाहेर पडला आणि गावाकडच्या वाटेनं चालू

लागला. दिवस मावळत चालला होता. आभाळ गढूळलं होतं. आजुबाजूला माणूसकाणूस नव्हतं. बंडा न्हावी एकटाच सपासप पाय उचलीत होता.

धोंडी लेंगऱ्यापाशीं पितरं होतीं ही गोष्ट सगळीकडे म्हाजूर होती. तीं त्यानं कोंकणांतून जबर रक्कम देऊन आणलीं होतीं. आणि शिकारी कुत्र्यासारखीं पाळली होतीं. तीं कशीं आहेत, काय आहेत हें कुणी प्रत्यक्ष पाहिलं नव्हतं. पण अशी बोलवा होती कीं, शेंदूर फासलेले ते बचकेएवढे गोटे आहेत आणि धोंडी लेंगऱ्यानं ते आपल्या झोपायच्या जागीं खोलवर पुरून ठेवले आहेत. त्याना नेहमी कांहीं तरी कामगिरी हवी असते. त्यासाठीं तीं सारखीं लेंगऱ्याला छळत असतात. त्याना राबवून घेण्यासाठीं लागणारे सारे मंत्रतंत्र लेंगऱ्याला माहीत आहेत. त्यासाठीं तो कडक पथ्यपाणी करतो. ग्रहणादिवशीं कमरेइतक्या पाण्यांत उभा राहून मंत्र जपतो आणि कधीं स्मशानात मध्यरात्रीं जाऊन बसतो...

चालता चालता बंडा न्हाव्यासारखा जवान माणूसदेखील भीतीनं घामाघूम झाला. वरचेवर मागं पाहूं लागला. न जाणो, अंगठ्याएवढे हातपाय असलेले ते तांबडे गोटे अकस्मात् मागून येतील आणि आपल्याला अलगंत उचलून निवडुंगाच्या काटेरी बनांत फेकून देतील. नाहींतर छातीवर थयाथया नाचतील आणि रक्ताच्या गुळण्या होऊन आपण मरूं. मग आपली पोरं वनवाशी होतील आणि आपली सर्व इस्टेट बापूची बायको बळकावील. म्हातारी शोकानं गपकन् मरेल आणि बिचारी कोंडी काकूनं अन्नपाणी न दिल्यामुळं दारोदार भिक्षा मागत हिंडेल...छे, हीं पितर आपला सत्यानाश करतील...

बंडा न्हावी थोडाफार टरकला. आणि मागं न बघतां सटक्यानं पाय उचलूं लागला. आता दिवस मावळून गेला होता. सगळीकडे अंधार कालवला होता. किडे कचकचत होते. शेजारच्या ओढ्याचं पाणी खळखळ करीत होतं. बंडा न्हावी मनांत टरकला होता. पण टरकून भागणार नव्हतं. कांहींतरी इलाज करायला पाहिजे होता. पैशाच्या बळावर धोंड्याला वाकवणं अशक्य नव्हतं. त्याच्याइतकाच एखादा जबर पिऱ्या शोधून आणून त्याच्यावर सोडणं अवघड नव्हतं. पण असा बहाद्दर कुठें मिळणार? आणि जरी मिळाला तरी त्यालाहि धोंड्यानं हटवला म्हणजे मग? खवळून गेलेलीं पित्रं काय करतील? त्यापेक्षा कांहीं

वेगळा, धोंड्याचा एकदम मटका बसविणारा उपाय शोधून काढणं आवश्यक होतं.

विचाराच्या नादांत घोर कमी झाला आणि पायाखालची वाटहि ओसरली. बंडा न्हावी आपल्या गावात आला. घरात शिरला.

दिवे लागले होते आणि न बोलता सवरता न्हाव्याचीं माणसं घरांत वावरत होतीं. मनातून भ्यालेलीं, हबकलेली. भुतानं पछाडल्यासारखीं. बापू न्हावी गुढघे उभे करून उगीच बसला होता. त्याचं पागोटं त्याच्या गुढघ्यावर होतं आणि दोन्ही हातानीं तो आपल टक्कल पडलेलं डोक गोंजारीत होता.

बंडान विचारलं,

"का रं, माझ्या माघारी काय घडल का ?"

"काय न्हाई. पर म्हशीन धार दिली न्हाई !"

"का बरं ?"

"राम जाणं. पर दुधाचा थेंब न्हाई तिच्या कासंत !"

"आटलीच म्हणावी का ?"

"हा !"

"पारडूं सुटून पेल होत का ?"

"न्हाई !"

"ठीक !"

बंडानं जाणलं कीं हाहि धोंड्याच्या करणीपैकींच एक प्रकार आहे. हत्ती-सारखी म्हैस दूध देईनाशी झाली. उत्पन्न बुडालं. दुधातुपाची बाजू बंद झाली !

रात्रींहि भाकरीची चव विलक्षण लागल्यामुळं बंडानं कांहीं खाल्लं नाहीं. मुलबाळं जेवलीं. कोंडी आणि जाणतीं पोरं घरात झोंपायला भिऊं लागलीं, तेव्हां त्याना शेजारच्या घरीं नेऊन झोपवलं. रात्रीं धोंडे पडले. म्हशीची वैरण आग लागून जळली. रात्रभर न्हाव्याच्या घरांत दिवा तेवत होता.

सकाळीं बंडा जागा झाला तेव्हां अंगावर असलेल्या धोतरावर बिब्याच्या काळ्या फुल्या पडल्या होत्या. अगदीं खडी काढल्यासारख्या. पण आतां

कोणत्याच गोष्टीचं नवल करण्यासारखं नव्हतं. करणीचे खेळ काय करतील आणि काय नाहीं याचा नेम नव्हता.

मनांत काहीं निश्चय करून बंडा तालुक्याला जायला निघाला. जातांना त्यानं पैशाची पिशवी कमरेला लावली. गांवांतून जातांना लोकानीं विचारलं,

" काय बंडा, काय तयारी ? "

" तालुक्याला जाऊन येतो ! "

" घरातला खेळ थाबला का ? "

" न्हाई ! "

" काय भानगड असावी बर ही? तुमच्या वाईटावर कुणी होतं का? करणीचा खेळ आहे हा. एखादा मंत्र्या बघून बंदोबस्त करा.! "

" हा."

" म्हैस आटली म्हणं तुमची? "

" हा."

" कडबाबि जळला म्हण, खर का ? "

" खरं."

" अस रोज होऊ लागल तर गावात रहाण कठीण झाल–पण गाव सोडून जाव तरी कुठ ? "

" होय की! "

" बराय्. जा मग. ऊन होतया! "

" हा. "

अशीं घुम्यासारखीं उत्तरं देऊन बंडा गावाबाहेर पडला आणि तालुक्याच्या वाटेला लागला. गावात चहुंकडे हा विषय चालला आहे आणि लोक आपली दया करत आहेत याची जाणीव होऊन त्याला वाईट वाटलं. बंडा न्हावी कधीं लोकाच्या दयेचा विषय झाला नव्हता. लेंगऱ्याचा मटका बसवलाच पाहिजे !

तालुक्याला आल्याबरोबर गावच्या एका माणसाच्या ओळखीनं न्हावी फौजदाराच्या घरीं जाऊन त्याला भेटला. बैठकीच्या खाली बसून त्यानं घरांत

चाललेल्या गोंधळाची तपशीलवार हकिगत फौजदाराला सांगितली, आणि आरामखुर्चीवर तंगड्या पसरून पाढरी विडी ओढीत फौजदारानं ती ऐकली शेवटीं न्हावी कळवळून म्हणाला,

"म्हाराज, हे शंभर रुपयं घ्या आन् त्या घोड्याचा काय तरी बंदोबस्त करा." फौजदाराला सगळी मजाच वाटली. तो हसला आणि म्हणाला,

"अरे, काय करणीच्या गोष्टी सागतोस पोरासारख्या? खोटं आहे सगळ!"

"न्हाई म्हाराज, खोटं म्हणू नका. सगळा गाव साक्षीला आहे. तुम्ही डोळ्यानीं बघा!'

"काय बघूं? तीं पितर मला दाखवशील?"

"ती दिसत न्हाईत साहेब, पन त्यानी केलेला गोंधळ बघा!"

"अरे, पोरीचे केस रोगानं गळले असतील. डॉक्टरला दाखव."

"अव अक्षी कात्रीनं कापावंत अस? पोरगीला रोगबीग काय न्हाई!"

मग फौजदारानं थोडा विचार केला आणि आपल्या सातवीती घोड्यावर टांग टाकून तो म्हणाला,

"चल, बघूं दे मला तुझीं पितर."

फौजदाराच्या घोड्याबरोबर धावपळ करीत बंडा न्हावी वाटेनं जाऊ लागला. त्याची दमछाट झाली. तो मागं पडला कीं फौजदार घोडा आवरी आणि ओरडे,

"रे न्हाव्या, दमलास का लेका? अरे, तुझ्यासारख्या जवानान घोड्याला मागं टाकलं पाहिजे!"

मग श्वास रोखून आणि धोतर आवरून न्हावी रपाट पळे. पण फौजदाराच्या घोड्याला चार पाय होते. आणि न्हाव्याला दोन.

अखेर दोघेहि गावात आले. न्हाव्याच्या घरापाशीं, घोड्याखालीं उडी मारून फौजदार सोप्यात चढला आणि मोठ्यानं गरजला,

"रे न्हाव्या, कुठायत पितरं? दाखव मला. मी कुस्ती खेळतो त्याच्याबरोबर."

फौजदार असा बोलला मात्र, कुठूनसा एक धोंडा आला आणि दाणकन् त्याच्या पायाच्या टोकापाशीं पडला. अगे मा गे!

दोन्ही हातानीं उचलणार नाहीं असा तो धोंडा फौजदाराच्या डोक्यात जर पडला असता तर एका फौजदाराचे चार फौजदार झाले असते. सुपारी फुटावी तसा तो जवान अधिकारी त्याखाली फुटला असता. न्हावी म्हणाला,

" बघा सायेब, आली परचींती ? "

साहेबानं आरडाओरडा केला. धोंडा कुणी फेकला ? हा पाजीपणा आहे. पितरबितर सब झूट आहे. आणि बघतां बघता न्हाव्याच्या घरानं पेट घेतला. एकाएकीं, आकस्मिक ! रॉकेल ओतून काडी लावावी तसा. लोकाची धांवाधाव झाली. मुग्यासारखी ओळ लावून लांबच्या विहिरीच पाणी आणून शिपल, विहिरीचा तळ दिसेपर्यंत शिपल, तेव्हा आग बसली. साहेब स्वतः पाण्याच्या कळशा देत ओळींत उभा होता. त्याचा भारी ड्रेस भिजून चिंब झाला. त्याला लोक म्हणाले, " साहेब, खोट म्हणूं नका. ही करणी आहे. कुणी तरी न्हाव्यावर पित्र सोडली आहेत."

काहीं एक न बोलता, गावातील चार दणकट रामोशी घेऊन साहेब घोड्यावरून दौडत वाडीला गेला आणि हातात पिस्तूल घेऊन अकस्मात् धोडी लेगऱ्याच्या घरात शिरला. मुळीच वासपूस न करता त्यान त्याला बाहेर काढला. वाडीपासून दूर ओढ्याच्या काठाला नेला. आणि निरगुडीच्या लांब, लवचिक फोका काढल्या. चारी रामोशाच्या हातीं दिल्या. आणि ऑर्डर दिली कीं. या साल्याला ठीक करा !

लेगऱ्याला झाडाला पाटमोरा उभा करून रामोशांनीं फोका ओढल्या. त्याच्या पाठीवर सपासप् ओढल्या. एक दमला कीं दुसरा पुढं होई, नवी फोक घेई आणि भिर्रकन् लेगऱ्याच्या कुल्ल्यावर ओढी. पण लेगरा ओरडला नाहीं. त्यान हूं का चू केलं नाहीं. फोकाचे वळहि त्याच्या अंगावर उठले नाहींत. तोंडांत तंबाखू धरून तो गप उभा राहिला होता. माराला पाठ देत होता.

सारे रामोशी दमले. त्याचे हात काम देईनात, तेव्हा झाडाखालीं बसून हा विलक्षण प्रकार बघत राहिलेल्या फौजदाराला, एक डोळा बारीक करून लेंगऱ्या म्हणाला,

" सायबा, तुझ्या बंदुकीची गोळी मारलीस तरी ह्या धोंडीच्या अंगाला भोक पडणार न्हाई ! का उगीच रामोशी दमवतोस ? न्हाव्यानं लबाडीनं माझी

जिमिन बळकावलीयू. ती माघारी घेतल्याबगार मी सोडणार न्हाई. तूं मधीं पडूं नगंस!"

साहेब शहाणा माणूस. त्यानं लेंगऱ्याला सोडून दिलं, एक पांढरी विडी ओढायला दिली. न्हाव्याला त्याचे शंभर रुपये माघारीं देऊन सांगितलं,

"गड्या, माझं कांहीं चालत नाहीं. लेंगरा माणूस नाहीं, सैतान आहे. हिंमत असली तर त्याच्याशीं खेळ. नाहींतर जमीन देऊन मोकळा हो!"

आणि घोडा उडवीत तो तालुक्याला निघून गेला.

# मारुतराया

जून महिन्यातल्या ओल्या सकाळीं गांवांत एक भला मोठा वानर आला. एकटाच. त्याचा गोतावळा त्याच्या मागं नव्हता. आमच्या भागात हा प्राणी अगदीच विरळा. त्यामुळंच सर्वांच्या कौतुकाचा, आदराचा. जवळ जवळ दहा बारा वर्षांनीं तो गांवांत दिसला. कुठून आला आणि कसा आला कोण जाणे! पण आला तो शेपटीची चवरी मिरवीत गावमारुतीच्या देवळात शिरला. गाभाऱ्यांत गेला आणि घटकाभरानं बाहेर येऊन शिखरावर बसला. लांब शेपटी हलवीत उनाला बसला.

हा विलक्षण प्रकार पांडू गुरवाच्या बायकोन बघितला, आणि पोरगी काखेला मारून ती बाहेर पडली. घोडं चारायला रानात गेलेल्या नवऱ्याला ही हकिगत सागणं अगदीं जरूर होतं. कारण मारुती गावात आला होता. देवळात जाऊन आला होता!

देवळाजवळ असलेल्या शाळेंत येण्यासाठीं गांवांतलीं गुलाम पोरं पाटीदप्तर हलवीत आलीं आणि शाळेच्या पायरीवर येऊन बसली. कारण शाळा अद्याप उघडलीच नव्हती. मास्तराचा चहा अद्याप व्हायचा होता.

तारेवर चिमण्या बसाव्यात तशीं तीं पोर पायरीवर दाटीवाटीनं बसली आणि आपल्या मिचमिच्या डोळ्यानीं नव्या सूर्याचा चमकदार प्रकाश बघू लागलीं तेव्हां मारुतीच्या शिखरावर बसलेला तो नवखा प्राणी त्यानीं पाहिला. आनंद, आश्चर्य आणि भीति यामुळ त्याचीं मनं उडू लागली.

मग मुसलमानाचं धीट पोर पुढं झालं आणि आपलं नकटं नाक खाजवीत ओरडलं,

“ अरं, वांडर वांडर हुप् तुझ्या शेंडीला शेरभर तुप !”

त्याची री सर्वांनींच ओढली. तेव्हां वानर आपलं काळं तोंड विचकून पोरांना भिवडवूं लागला. जागच्याजागीं नाचूं लागला

मग मुसलमानाच्या पोरानं धोंडा उचलला आणि नेमानं त्याच्या पाठींत बकावला. त्यासरशीं वानर हातभर उडाला. वेदनेनं कळवळला. ची ची ओरडत पळाला आणि पिंपळाच्या शेंड्यावर जाऊन पानात दडला. पोरं खालीं जमा झालीं तेव्हा त्याना दम देऊं लागला. त्यामुळं पोरं जास्तीच चेवलीं आणि भराभर धोंडे फेकूं लागली. पण वानर फार उंच होता. धोंड्याची फेक त्याच्यापर्यंत पोंचेचना. हें त्या धूर्त प्राण्याच्या ध्यानात आल. पिंपळाचीं कोवळीं पानं खात तो आरामात बसला.

दरम्यान ही बातमी पांडू गुरवाला मिळाली होती. तो घाईघाईनं घरीं आला आणि टोपल्यातली कोरभर भाकरी घेऊन पिंपळाखाली गेला. धपाटे घालून त्यानं पोरं हुसकून लावली. आरडाओरडा केला.

" कुठं फेडाल रं हें पाप? बारावरची बारा जमून आलाया आन् मारुतरायाला धोंडं घालत बसला. त्यानं काय केलयू रं तुमच?"

गुरवानं धुडकावलीं तेव्हा तीं चावट पोर गुरवाला शिव्या घालीत आणि त्याचीं उंडग्या बायकाशीं असलेली लफडीं मोटमोठ्यानं उच्चारीत पळाली.

हातातला भाकरीचा तुकडा वर करून पांडू वानराला बोलावूं लागला,

" या या हनुमंता, हे घ्या!"

पण वानर पालेच खात बसला. त्यान गुरवाकडे बघितलं नाही.

रानांत जातां जातां ही मजा बघत उभे राहिलेल्या म्हाताऱ्या आबानानानीं गुरवाला वेड्यात काढलं. हनुवटीला झोले देत म्हटलं,

" लेका पांड्या, आज वार कोणता?"

" सनवार, नाना!"

" मग भाकरी कशी घेणार रं तो मारुतराया?"

" मग?"

" अरं फराळाबिराळाचं काय आण, गाढवा!"

नाना वारकरी होते. मोठे भाविक होते. गांवांतली चार मंडळी जमवून ते



भजन करीत. भजनाचा, टाळ, मृदंग इत्यादि सारा सराजम त्यांच्या घरीं होता. रामजन्म, मारुतिजन्म, असले समारंभ ते मोठ्या हौसेनं करीत. म्हाताऱ्याच्या शब्दाला गावांत चागला मान होता !

नानांचं हें बोलणं गुरवाला पटल. धादलीनं घरीं जाऊन तो मूठभर शेंगदाणे घेऊन आला. ते दाखवून वानराला विनवूं लागला,

" देवा या, हे घ्या. देवा, खाली उतरा !"

पण वानर नुसताच डोकावून खाली पाही. पाढऱ्या पापण्याची चमत्कारिक उघडझांप करी. आपल्या काळ्या, लांबसडक बोटानीं काखेत खाजवी आणि कोवळा पाला ओरबाडून खाई.

वानर बधेना तेव्हा गुरव नानाना बोलला,

"नाना, माझ्या पाप्याच्या हातचा फराळ घेणं त्याला पसंत नाहीं. तुम्ही बघा."

तेव्हा नाना पुढं झाले आणि शेंगदाणे हातीं घेऊन विनवू लागले,

" देवा, मी तुमचा दासानुदास आहे, माझा निवद्य घ्या. म्हाताऱ्याची सत्त्वपरीक्षा घेऊं नका !"

नानानीं नाना परीनं विनवलं, पोथीत ऐकलेल्या सबोधनानीं हाका घातल्या, तेव्हां वानर खालीं उतरू लागला.

आतापर्यंत बरेच गांवकरी गोळा झाले होते. मारुती खालीं उतरूं लागला तशीं त्यांचीं मनं अधीर झालीं.

वानर बुंध्याशीं आला. पिंपळाच्या बेचक्यात बसला. नाना जवळ गेले. आणि त्यांनीं हात वर केला. वानर पुढं वाकला. नानांशीं भिडला. आपल्या काळ्या पंजांनीं त्यानं म्हाताऱ्याचा हात धरला. गमतीदारपणं इकडेतिकडे बघितलं.

नाना म्हणाले,

" घ्या. घ्या आता अनमान का ?"

मग एकाएकीं वानरानं तोंड पुढं केलं आणि मकेचं कणीस दातरावं तसा नानांचा हात दातरला. काडरला. आणि शेपुट उडवीत तो पुन्हा झाडाच्या शेंड्याशीं गेला.

त्या चाव्यानं नाना कळवळले. झीट येऊन खाली बसले ! लोक धावले. म्हाताऱ्याला आल्हाद उचलून आणून त्यांनीं घरांत झोपवलं. आणि हातावर गांवठी उपचार केले. बापाचा हात फोडलेला बघतांच थोरला पोरगा कळवळला. पेरणीच्या कामीं म्हातारा निकामी झाला. आता रोजगारी गडी बघणं आलं या विचारानं फार हळहळला.

मग गावातले लोक कुजबुजले कीं, नानाचा आपल्या सुनेशीं संबंध आहे हें खरं असलं पाहिजे. त्याशिवाय वानरानं त्याना फोडलं नसतं! आणि त्यानंतर मारुतीला शेंगदाणे द्यायला कुणीच तयार होईना. कुणीच धजेना. विषाची परीक्षा बघा कुणी? पण गावात आलेला देव उपाशी ठेवावा कसा? गुरवाच्या मनाला ही गोष्ट पटली नाहीं. आपल्या आठ वर्षाच्या मुलीला शेंगदाणे देऊन तो वानराला म्हणाला,

"देवा, हे लेकरु अस्राप हाय. ह्याच्या हातच्र तरी घ्या!"

ती अजाण पोर हातात शेंगदाणे घेऊन उभी राहिली तेव्हा वानर पुन्हा खाली आला आणि पोरीची पोटरी फोडून गेला! सोनाराच्या लिंबावर जाऊन बसला. गुरवाच्या बायकोन उर बडवून घेतल. आणि वानराच्या नावानं बोटं मोडलीं. तालुक्याच्या दवाखान्यात दाखवण्यासाठीं पोर पाठीशीं टाकून गुरव निघून गेला.

यावर लोक कुजबुजले,

"गुरवाची आणि त्याच्या बायकोचीहि चालचालवणूक बरी नाहीं त्यामुळं असं झालं."

वानर कुणाच्याच हातच्र खाईना तेव्हा सर्वांना मोठी पचाईत पडली. पानाच्या चंच्या सोडून, घोळक्याघोळक्यान उभ राहिल्याराहिल्या त्याच्या चर्चा चालू झाल्या.

दरम्यान सोनाराच्या लिंबावरून वानर लव्हाराच्या जांभळीवर गेला. तेव्हा खालीं बघून मुकाट मोट ठोकणारा लव्हार, तोंडातला तंबाखूचा गुळणा टाकून उठला आणि पोराला पाजत बसलेल्या बायकोला म्हणाला,

"थोड्या शेंगा दे ग. वानर आलाय आपल्या दारात!"

"येडं का काय तुमी? मरू दे त्यो वानर. आपलं काम बघा."

"अग, दारात आलाया आपणहून. त्याला काय तरी दिल पाहिजेल!"

बायकोची वाट न बघतां बयत्याच्या आलेल्या शेंगातल्या ओंजळभर काढून तो बाहेर आला आणि वानराला दाखवून बोलावूं लागला. आजुबाजूस कुणी नाहीं हें पाहून वानर खाली आला आणि लव्हाराचं तंगड चावबून धूम

पळाला. गावांतला एकुलता एक लव्हार जायबंदी झाला. आतां शेतकीचीं अवजारं बनविणार कोण ?

त्या लठ्ठ्या वानरानं सकाळपासून तिसरा प्रहरपर्यंत असा धुमाकूळ घातला. पिसाळलेल्या कुत्र्याप्रमाणं ते दिसेल त्या माणसावर दात चालवूं लागलं. तेव्हां नानांचा थोरला पोरगा अधिक खवळला. बचकेसारखे धोंडे हातीं घेऊन जाभळीखाली आला. रागानं वानराला म्हणाला,

" राया, तू फार डाळ नासलीस ! "

आणि नेम धरून त्यान धोंडा भिर्कावला. हिकमतीनं एका अंगाला होऊन वानरान तो चुकवला आणि दात विचकीत तो नानांच्या मोठ्या मुलावर धावून आला. दुसरा धोडा उचलून पोरगाहि हुषार राहिला. तेव्हा वानर चारी पायावर अल्हाद उड्या घेत आण्णा जरगाच्या मळ्यात घुसला.

हातात धोंडा घेऊन नानाचा पोरगा त्याच्यामागं काळासारखा लागला. त्याचा आवेश बघून गावातली आणखी काहीं तरणींबाड पोर त्याच्याबरोबर धावली. काठ्या, धोंडे घेऊन धावली.

दोन चार मैल ताणपट्टा काढल्यावर वानर थकला. अंगावर आलेले धोंडे चुकविण्यात त्याच्याकडून कुचराई होऊं लागली आणि मग दहा बारा धोंड्यांत तो खाली पडला. पडला तसा पोरांनीं गराडा घालून त्याला मधें घेतला. आता आपण वाचत नाहीं हे जाणून तो शहाणा प्राणी केविलवाणे हातवारे करून आपल्याभोंवतींच फिरू लागला. तेव्हा वाण्याचा सदा हात आवरून नानाच्या पोराला म्हणाला,

" अर अर, तो हात जोडतोय्. पाया पडतोय्. मला मारुं नका म्हणतोय्. "

पण नानाच्या पोराला क्रोध आवरला नाहीं. आवेशानं पुढं होऊन त्यानं वानराला काठ्या घातल्या. बाकीच्या पोरानीं निर्दयपणें त्याला धोंडळला. नाका-तोंडाला रक्ताचे बुडबुडे येऊन, हातपाय झाडून वानर मेला. निचेष्ट पडला. तेव्हां त्याचे दोन्ही पंजे एकमेकांत गुतले होते, आणि केसांचं शिप्तर असलेलं त्याचं डोकं मातींत भरलं होतं.

ती त्याची दशा बघून नानाच्या पोराला कणव आली.

तो विचार करून बोलला,

"पोरानूं, एकजण हतं रहा. आमी जाऊन टाळमृदंग घेऊन येतो. मारुतीला वाजत गाजत माती देऊं!"

त्याचा आवाज विलक्षण मऊ आला होता.

मेल्या वानराकडे दयाळूपणानं बघून सदा बोलला,

"गरीब आपल्या हातनं मेला. वाईट गोष्ट झाली!"

मग सर्वांच्या सांगण्यावरून तो गिधाडं वारायला तिथं राहिला आणि पोरं गांवांत आली. वानर मारल्याची हकीगत लोकाना कळली, तेव्हा त्यानीं हात जोडले आणि गावात घडलेल्या या अपराधाबद्दल क्षमा कर, अशी मारुतीला विनवणी केली.

भजनी मंडळीसहित पोरं रानांत गेलीं. रामनामाचा गजर करीत त्यानीं मोठ्या मानसन्मानानं वानराला ओढ्यात आणला आणि माणमासारखा जाळला!

नानाच्या जिवाला ही गोष्ट फार लागली. दुखण्यातून बरे झाल्यावर त्यानीं ज्या जागीं वानर मारला त्या जागीं एक दगडी चौथरा बांधला.

आतां भाविक लोक जाता येता त्याच्या पाया पडतात!

# कलागत

गावांत कुलकर्ण्यांचीं आठ घरं आहेत. आठ जणाचीं तोंडं आठ दिशांना असतात. बारा महिने तेरा काळ भाऊबंदकी चाललेली असते. वतनाची आणे-वारी होऊन प्रत्येकाला पांच वर्षं पाळी येते. कुणीतरी एकजण सरकारी अधि-कारी होतो. आणि या पाच वर्षांत पुन्हा पाळी येईपर्यंत पुरेल इतकी लाच खातो. बाकीची सातजण त्याच्या नावानं जळतात. त्याच्यावर नाना तोहमती आणण्याचा प्रयत्न करतात. पण तो बहाद्दर त्याच्याच कुळातला असल्यामुळं सगळ्याना पुरून उरतो. पाच वर्षं रगरग करतो.

यंदा सखाराम पाडुरंगकडे पाळी आली होती. त्याच्या आयुष्यात तो प्रथमच कुलकर्णी होत होता. कारण बापाच्या मरणानंतर या पोरक्या पोराना घेऊन त्याची आई शहरगावीं गेली आणि मोठ्या जहाबाजपणं तिनं पोरं कळतीं होईपर्यंत दिवस काढले. त्याना लिहावाचायला शिकवलं. आणि मग ती गावीं आली. तोंपर्यंत त्याची पाळी भाऊबंद करीत होते आणि ठरलेला खंड तिला देत होते. पण आता सखाराम पाडुरंग वीस बावीस वर्षांनीं फिरून आपलं वतन सभाळणार होता. गावाच्या पादरीचा हा भेडा कसा होता? काय होता?

पाच फूट उंचीचा आणि विड्या ओढून छातीचं खोक झालेला तो एक फाटका आदमी होता. घरची ऐपत नसल्यामुळं त्याचं अद्याप लग्न झालं नव्हतं. वय उलटून गेल्यामुळं पुढं होण्याची आशाहि नव्हती. म्हणून अलिकडे तो एखादी बाई ठेवायचा विचार करीत होता. तसं घरीं भावंडांना आणि आईला वरचेवर बजावत होता. पण त्या सर्वांना ठाऊक होतं कीं, बाई ठेवाय-लाहि ऐपत लागते. त्यामुळं ते बेफिकीर होते. आणि सरड्यासारखा दिसणारा हा माणूस गांवच्या लव्हार-सोनाराच्या दुकानीं, सुतारमेटावर किंवा शाळेच्या कट्ट्यावर आपला निश्चय जाहीर करीत होता.

एक साल जोशीपणाहि त्याच्याकडे आला. गावांतील लग्नं त्याच्या हातून लावलीं गेलीं. विधवा बयानं आपल्या थोरल्या पोराच लग्न उरकून घेतलं तेव्हा सखारामनं तिला भिरभिरं आणलं. पद्धतीप्रमाणं त्या बाईनं लग्नाला लागणाऱ्या सुपाऱ्या, खारका, बदाम हे जिन्नस स्वस्ताईचे, किडके, बारिक आणि खवट असे आणले होते. सखारामच्या जेव्हा तें नजरेंत आलं तेव्हा तो विलक्षण चवताळला. जिन्नस चागले असतील तरच लग्न लावीन, नाहीपेक्षां लावणार नाहीं म्हणाला. तेव्हा बाईनं पडत घेतलं आणि सगळे जिन्नस पुन्हा आणवले! सखारामचं समाधान झालं. लग्न पार पडल.

चारसहा दिवस गेल्यावर बयाच्या ध्यानात आलं कीं, कणीक, गूळ, हरबऱ्याची डाळ या आणि अशाच इतर अनेक जिनसाप्रमाणं सखारामन अंतरपाटाचं वस्त्रहि आपल्या घरी नेलं आहे! वास्तविक अशी पद्धत नव्हती. न पुसतां सवरतां सखारामनं हा कारभार केला होता. म्हातारीला वैनाग आला. तोंडानं वटावटा करीत ती सखारामच्या घरी गेली आणि उंबऱ्यात फतकली घालून बसली. सखारामची सोवळी आई भितीला टेकून तपकीर ओढीत बसली होती, तिला म्हणाली,

"काय म्हणावं हो तुमच्या लेकाला?"

आपल्या लेकाच्या कर्तृत्वावर भलताच विश्वास असलेली ती म्हातारी तपकिरीचा झटका सोशीत म्हणाली,

"गावचा वतनदार आहे तो. सगळं गाव जें म्हणतं तें तूं म्हण!"

"मला हाय टावं तो वतनदार हाय. माझ्या नामूच्या लग्नात शेला घेऊन आलाय तो तेवढा माघारी द्या माझा!"

"कसला ग शेला? तुझ्या घरचं कापड आणून अंगावर घालायला आम्हाला काय भीक लागलीय?"

चवड्यावर बसलेली बया म्हातारीच्या दिशेनं सरासरा पुढं सरली. तिच्या तोंडापुढं हात नाचवीत म्हणाली,

"माझ्या लेकाच्या लग्नांत बामण होता तुझा वतनदार—त्याला पूस!"

"असंल जरूर तर तूं पूस. मला ग काय करायचं?"

" शेला न इचारतां नेला मला. अशी वहिवाट नाहीं. तो परत द्या ! "

" वहिवाट तूं मला शिकवतीस काय ग? आणि माझा लेक इतका हपापला नाहीं कापडांना. मनांत आणील तर असल्या शेल्यांचा ढीग लावील घरांत. हां ! "

बयाला म्हणायचं होतं, 'अग पुरेत तुझ्या चळका. इतका तालेवार आहे तुझा लेक तर छप्पन ठिकाणीं मुरड घातलेलं धोतर का नेसतो ? येड्या-पाग-ळ्यांचीं लग्नं होतात आणि त्याचं का अजून झालं नाहीं ?' पण तिला गावांत वागायचं होतं. आज ना उद्यां कामधंद्यासाठीं कुलकर्ण्यांची नड तिला लागणार होती. सखारामच्या हातीं आज सत्ता होती. तेव्हा ती मऊपणानं बोलली,

" व्हय् बाई, हाय तुझा लेक तालेवार. आम्ही गरीब माणसं. माझं पोरगं थंडीवाऱ्याचं तो शेला पांघरंल!" बया अशी खळीला आली तेव्हा म्हाता-रीनं तिला उडवून लावलं,

" मला तुझा शेला ठाऊक नाही! लेक चावडीवर गेलाय् तो आला म्हणजे त्याला विचार. माझं टाळकं उठवूं नकोस! "

आणि ती भुईला हाताचा रेटा देऊन उठली. घरांत कालवणाला काहीं नव्हतं म्हणून उसनी डाळ मागायला कुंभाराच्या घरीं गेली.

म्हातारीनं दार दडपून घेतलं तेव्हां बडबडत, हातवारे करीत बया घरीं आली आणि आपल्या धाकट्या लेकाला म्हणाली,

" चावडीकडं जा रं. सखाराम बामण घरीं गेला म्हणजे मला सांगत ये ! "

पोरगं गेलं.

चावडीसमोर जाऊन कुलकर्णी घरीं जाण्याची वाट बघूं लागलं.

चावडीवर उगीच उशीरपर्यंत बसून सखारामनं म्हारारामोशांना पोकळ दाब दिला. हुकूम सोडले. शिव्या घातल्या. आणि पोटांत भूक ओरडूं लागली तेव्हां चौगुल्याकडून तमाखू मागून घेऊन दाढेला धरली. उशीर भलताच झाला. जेवणवेळ टळून गेली. बयेचं पोरगं वाट बघून बघून कंटाळलं तरी सखाराम रुबाबानं कोरे ताव आंखीत होता. सातबाराचीं बुकं चाळीत होता. अखेर चावडीसमोरचा बशा महार सोडून तिथं कुणी चिट्पाखरूं राहिलं नाहीं.

माथ्यावरचा सूर्य कलून चावडीची सावली समोरच्या झाडाला टेकली, तेव्हां तो उठला आणि तोंड वर करून घराकडे आला. चहा करून देण्यासाठीं म्हातारी-वर खेंकसला. नित्याप्रमाण दोघाचा खटका उडाला. 'तूं मी' झाली. वाईट-वकटे शब्द आणि चार शिव्या याची देवघेव झाली. तेव्हां म्हातारीनं चहा केला आणि पंचपात्र भरून लेकापुढं ठेवला.

बयाचा पोरगा धावत घरीं गेला आणि सखाराम घरीं गेल्याची बातमी त्यानं आईला सांगितली. नी ऐकताच हातांतलं काम टाकून बया लगालगा सखारामच्या घरीं गेली. उंबऱ्यात बसत म्हणाली,

"अवं कुरकळणी!"

पण तिच्या हांकेला सखारामऐवजीं म्हातारीनंच ओ दिली. ती स्वयंपाक-घराच्या आडोशांतून ओरडली,

"कोण आहे? कुलकर्णी घरीं नाहीं!"

पण बयाला बरोबर पत्ता लागला होता.

"ऊं, न्हाई कसा? आता चावडीकडनं आलेला मी बघितला!"

बयेनं पाळत ठेवली असली पाहिजे हे म्हातारीनं ओळखलं. धूर्तपणानं उत्तर दिलं,

"आला होता खरा, पण लगेच धोतर घेऊन आघोळीला गेला विहिरीला!"

"कंच्या विहिरीला?"

"मला ठाऊक नाहीं! गांवांत काय एक विहीर आहे?"

मग बया बसूनच राहिली. कुलकर्ण्याची गांठ घेतल्याशिवाय ती उठायला तयार नव्हती. काहीं न बोलता सवरता ती गव्हा वाणिणीसारखी दारांत धरणं धरून बसली. पण तास झाला, दोन तास झाले, तरी आंघोळीला गेलेला सखाराम पाण्यात पडल्यासारखा तिकडेच राहिला. घरीं आलाच नाहीं. म्हातारी स्वयंपाकाला लागली आणि बयाच्या पायाला बसून बसून मुंग्या आल्या तेव्हां ती चडफडून उठली आणि म्हणाली,

"मी जाते. आघोळीसनं आल्यावर सांगा मी आले होते म्हणून!"

म्हातारी उत्तेजित स्वरानं बोलली,

" होय होय, सांगीन हं सागीन. कामधंदा सोडून कां बसली असशील उगीच ? त्याचं काय मेल्याचं ! तिकडंच कुणी दादाआप्पा भेटला असला तर तालुक्यालासुद्धां जाईल! "

बया निघून गेली तेव्हा इतका वेळ स्वयंपाकघरात चोरट्यासारखा बसलेला सखाराम म्हणाला,

" गेली थेरडी ! मला पाणी दे आघोळीला! "

आणि परसांत बसून त्यानं कावळ्यासारखी आघोळ केली. मटामटा चार घास खाल्ले. दोन पायावर बसून विडी ओढली. अंगावरचं धोतर तोंडावर घेऊन जात्याशेजारीं ताणून दिली.

चारपाच दिवस अशी चुकवाचुकवी केल्यावर एके दिवशीं फसगमतीनं तो सापडला. चाणाक्ष बयेनं त्याला बरोबर घरीं गाठला. आणि रागेजून ती म्हणाली,

" माझा शेला द्या. किती दिवस हेलपाटं घालतीया. गांठच पडून घ्याना माझी ! "

सखारामनं न बोलता विडी पेटवली. झुरके मारायला सुरवात केली. बयेकडे लक्षच दिलं नाही. त्याच्या सगळ्या हालचालींकडे बया बघत होती. तो आतां बोलेल, मग बोलेल, अशा अपेक्षेनं बघत होती. पण सखाराम बोललाच नाहीं. तेव्हा तिनं तोंड उघडल,

" किती हेलपाट घाल ? मी मोकळी न्हाई. आवरा चट्‌शिरी ! " तेव्हा जणूं आपल्याला काहींच माहिती नाहीं अशा तऱ्हेनं सखाराम म्हणाला,

" काय म्हणालीस बया ? मला काही बोललीस का ? मी म्हणतोय् तूं आईकडंच काहीं कामाला आलीस ! "

" न्हाई, तुमाकडंच आले. माझा शेला द्या ! "

" कसला शेला म्हणतीस बया ? "

बयेनं हनुवटीला बोट लावून म्हटलं,

" हां ! लग्नात शेला आणला माझा तो माघारी न्हाई का द्यायचा ? "

" हां हां, तें फडकं होय ! कुठं गळबटलं असेल पसाऱ्यांत. ठेवतों बघून. सकाळच्या प्रहरीं येऊन घेऊन जा. "

बयेनं डोक्यावरचा पदर सारखा करीत म्हटलं,

"मला न्हाई तिनतिन्दा यायला सवड. बघा आत्ताच आन् द्या!"

"आता नाहीं सापडणार. मला चावडीत जायचं आहे. सकाळीं देतों चौगुल्याजवळ धाडून. तू नको घेऊस हेलपाटा."

"पर शेला आणलया तरी का तुम्ही?"

"आणलाय तर! खोटं कशाला बोलू? तुझा शेला बळकावून मी काय श्रीमंत होणार आहे!"

"मग तुमची म्हातारी कशी नाही म्हणतीया?"

"तिला काय ठाऊक? तिला त्यातलं काही ठाऊक नाहीं. ती पंचाईतच करत नाहीं कशाची!"

इतका वेळ आत राहून ऐकणारी म्हातारी बाहेर आली. कमरेवर हात देऊन म्हणाली,

"सखाराम, बाबा, तू काहीतरी झेंगट करून बसतोस आणि या बायका येऊन मला छळत बसतात. माझ्या घरची साल काढली हिनं. केव्हा आणला होतास हिचा शेला?"

सखाराम हंसला आणि बोलला,

"तुला काय करायचं आहे, आई? माझं मी बघतों. जा ग म्हातारे, सकाळीं धाडून देतों तुझ्या घरीं फडकं. अग, मला तुझं गरिबाचं घेऊन काय मिळतयू?"

म्हातारी मान झिंजाडून चालती झाली.

दुसऱ्या दिवशीं चौगुल्यानं शेला आणून दिला नाहीं. आणि सखाराम कामासाठीं जो तालुक्याला निघून गेला तो आठ दहा दिवस घरीं आलाच नाहीं! जेव्हा आला, तेव्हा बया त्याच्या घरी गेली आणि चढ्या आवाजांत म्हणाली,

"माझा शेला द्या. त्याशिवाय मी दारातनं हलणार नाही!"

बया अशी चढावर आलेली बघताच सखाराम एकदम फिरला. मग्रुरीनं म्हणाला,

" कसला शेला ? "

" हा ! किती लबाडी वं ही ? "

" कोण लबाड ? माझ्या उंबऱ्यात जेव्हा तेव्हा येऊन बसतीस. तुझ्या बापाचं काय देणं लागतोंय् मी ? "

सखारामानं आवाज एकदम चढवला तेव्हां म्हातारी सटपटली.

" अरं पर तूच म्हणालास कीं, मी आणलाय आन् देतो ! "

" कधीं ? उगीच डोकं उठवूं नकोस. चालती हो माझ्या घरातून ! "

" हा, काय बाई तरी तऱ्हा म्हणावी ! अरं माझा शेला दे मग मी जाते. मला काय घरदार न्हाई तुझ्या दारात बसायला ? '

" बुटान मारीन थेरडे आता कमीजास्त बोलशील तर ! उठ, उठ, हो चालती ! "

सखाराम अंगावर धावून आला, तेव्हा म्हातारी घाबरली आणि रडत-ओरडत घरीं आली. मुंबईला कामाला असलेल्या पोराला तिनं कागद टाकला कीं, ' सखाराम कुलकर्ण्यानं माझी धींड काढली. माझ्यावर बूट उगारला. तूं ये आणि त्याच्याकडं एकवार बघ. आईचा सूड घे ! ' आणि ती लेकाच्या येण्याची वाट बघत राहिली.

पाडवा जवळ आला होता. तोपर्यंत सवडहि नव्हती. तेव्हां कागदाला उत्तर न देतां बयेचा लेक तुळशीराम थाबला आणि पाडव्याच्या टिपणावर गावांत येऊन हजर झाला !

रात्रभर म्हातारीन झालेली हकिगत त्याला रडरडून सागितली तेव्हां तो सूडानं पेटला आणि आईला म्हणाला,

" आई, तू रडू नगंस. मी कुरकळण्याकडं बघतों ! "

बया म्हणाली,

" बघ, चांगल बघ माझ्या लेकरा. पण पयला खंडु बामणाकडं जा. त्याच्या इचाराशिवाय काहीं करूं नकोस ! "

सकाळच्या प्रहरीं जरीचा फेटा बांधून तुळशीराम खंडू कुलकर्ण्याच्या घरीं गेला. हा सखारामचा भाऊबंद गांवांतला चौफेर टग्या होता. अधिकारी

लोकांना हुरड्या-गुऱ्हाळाला नेऊन तो खूष करी. त्यामुळें त्याचं कोर्टकचेऱ्यात वजन होतं. गावातले लोक त्याला टरकून असत. कसल्याहि बाबतींत त्याचा विचार घेत.

तुळशीराम गेला तेव्हा तो नुकताच जागा झाला होता. अंथरुणावर बसून विडी ओढीत होता.

"रामराम, कुरकळणी–"

"रामराम. कधीं आलास तुळशीराम ?"

"आलों कालच !"

"का पाडव्याला ?"

तुळशीराम थोडासा घुटमळला आणि म्हणाला,

"तुम्हाला ठाव असलच. तुमच्या सखागमान आमच्या म्हातारीबरोबर कलागत केली !"

"होय ? मला नाहीं ठाऊक. काय म्हातारीला शिव्याबिव्या दिल्या काय?"

"तर वं! बुटानं हाणीन म्हणाला. असं बोलावं का त्यानीं? तुमीच काय तो न्याय करा!"

"हे बघ, तुळशीराम, आमची भाऊबदकी पडली. मी जर यात पडलो तर त्याला वाटणार मुद्दाम मीच हा डाव टाकला. तेव्हा मला गड्या यात गुतवूं नकोस!"

"मग?"

"तुला कळेल तस कर!"

"तुमची ना नाहीं?"

"नाहीं. त्याला जरी तू जोड्यानं हाणलास तरी मी तुला बोलणार नाहीं!"

ही बातचीत झाल्यावर तुळशीराम जो तावानं उठला तो घरीं निघाला. आणि वाटेतच त्याला सखाराम भेटला. भेटला तसा तुळशीराम पुढं झाला आणि त्याचं मानगूट पकडून म्हणाला,

"आमच्या म्हातारीला बुटानं मारतोस नाहीं का? आ? हा घे बूट. मुंबईचा आहे!"

आणि पायातला बूट उपसून त्यानं सखाराम कुलकर्ण्याला पडोस्तर ठोकला. सखारामनं तो मार मुकाट सोसला. हा प्रसग घडला तेव्हा आजुबाजूला कुणी चिट्पाखरूं नव्हतं. केवळ नाथा महार रानातून परत येत होता. त्यानं ही कलागत बघितली आणि धावत येऊन सखारामशीं झट्या घेत असलेल्या तुळशीरामला एकीकडे ओढून म्हटलं,

" हे काय, हे काय पाटील ? कशापायी असं ? "

दमगीर झालेला तुळशीराम नाकातून वाफ सोडीत बोलला,

" साला म्हातारीला बुटान मारतोय् ! अर, काय तुझी हिम्मत असंल तर माझ्यावर उगार तुझा बूट ! "

कपडे ठाकठीक करून आणि पडलेला रुमाल उचलून सखाराम घरीं गेला. गपचिप गेला.

दोनचार दिवसानी तालुक्याहून तुळशीराम आणि नाथा महार याना बोलावणं आलं आणि सर्वांना कळून चुकल कीं, सखारामनं फौजदारी केली.

दोघेहि जाऊन फौजदारापुढं उभे राहिले.

फौजदार जातीनं कैकाडी होता. अंगान रेड्यासारखा होता. त्यानं नाथ्याला विचारलं,

" काय रे, तूं मारामारी बघितलीस का ? "

" होय महाराज ! "

" कुणी कुणाला मारलं ? "

या प्रश्नावर महार लटपटला. कारण त्याला दोघाचीहि मर्जी संभाळणं भाग होत. सखारामची आणि तुळशीरामचीहि.

" महाराज, मी लाब हुतो. दोघंहि एकमेकाच्या अंगाला भिडत होती. मग कुणी कोणाला मारलं हे परमेसराला आन त्येचं त्येना ठाव ! "

" खोटं सांगतोस साल्या. नीट बोल ! "

पण महार नीट बोलेना. तेव्हा फौजदारानं त्याच्या कानाखाली काडकन् आवाज काढला. तेव्हा तो कळवळून बोलला,

" आमा गरिबाला का तोशीस ही सायेब ? खोट सांगून आमाला काय फायदा ? ह्या तुळशीरामानी कुरकळण्यास्नी बुटानं हाणल ! "

मग फौजदारानं महाराला सोडलं आणि तुळशीरामला पेचांत धरला. तेव्हां तें पोरगं घाबरलं आणि खंडु कुलकर्ण्याकडे येऊन त्यानं त्याचे पाय धरले,

" मी मरतोय ह्यांत. तुमी वाचवा ! "

" लेका, मी काय करूं ? आता भोग शिक्षा वरीसभर. आणि ये सुटून ! "

" नका नका. माझी नोकरी जाईल, माझी म्हातारी मरंल ! "

तुळशीरामानं फार विनवण्या केल्या तेव्हा खंडू म्हणाला,

" बरं मग अस कर, फौजदाराला द्यायला पाचशें रुपये दे माझ्यापाशीं. ते घेऊन ऐकला तर बघतों तो– "

मग तुळशीरामनं बायकोच्या अंगावरच किडूकमिडूक विकल आणि पैशांची भरती केली. ते पैसे खिशात घालून खंडू तालुक्याला गेला आणि फौजदाराला म्हणाला,

" माणूस आपला आहे तो, भाऊसाहेब. समज देऊन द्या सोडून. "

आणि पाचश्यातले दोनशें त्यानं त्याच्या हातावर ठेवले.

" अरे, मग अगोदर कळवायचं नाहीं मला ? ठीक, ठीक, मी करतों व्यवस्था ! "

भाऊसाहेब काकडीला राजी झाले आणि समज देऊन त्यानीं हे प्रकरण मिटवून टाकलं !

आता सखाराम हातात गुप्ती घेऊन गावात फिरतो. म्हणतो,

" तुळशा सुटत नव्हता. पण आमच्या लोकांत एकजूट नाहीं. कुऱ्हाडीचा दांडा गोताला काळ झालाय्. पण माझ्या हातांत हत्यार आहे. तुळशाला पाठीशीं घेणाऱ्याला ठाऊक नाहीं हें अजून ! "

हें समजल्यावर खडू मिशीवर हात फिरवीत म्हणतो,

" हात अवघडेल म्हणावं. माणूस ठेव हत्यार वागवायला ! "

# गुप्त धन

सध्याकाळच्या सुमारास रानामाळांतून दमून भागून आलेली मंडळी देव-दर्शनासाठीं गावच्या मध्यभागीं असलेल्या मारुतीच्या देवळात गेली, तेव्हां त्याना कुणी एक परका माणूस भुईवर झोंपलेला आढळला. त्याच्या अंगावर असलेल्या कपड्याच्या चिध्या झाल्या होत्या. पाय धुळीनं माखले होते. दोन्ही कोपऱ्यामध्यें डोकं दाबून तो शांत झोंपला होता. अंगावरच्या कपड्याखेरीज त्याच्यापाशीं काहीहि नव्हतं. पायात पायताणं नव्हतीं कीं जवळ एखादं घोगडं नव्हत.

जमलेल्या मडळींतील एक जणान त्याला पाहिला आणि म्हटल, " कोन निजलया ते ?"

त्याची झोंप इतकी गडद होती कीं दोन तीन वेळां हाका मारल्या, खांद्याला धरून हलवल, तरी तो जागा झाला नाहीं. तेव्हा म्हातारा सोनार उठवणा-राला म्हणाला,

" अरं का झोपमोड करताय त्याची, आ ? "

उठवणारा म्हणाला, " माणूस परगावचा दिसतोय् बाबा. चौकशी करायला पायजे."

" जागा झाला म्हजे करा. तुम्हाला कोण नग म्हणतया का ? "

" दर्सनासाठी बायामाणसं येतील बामणाची. आन् हा असा निजलाया अंधारात. तुम्ही अस कसं म्हनता ? चौकशी केली पायजे. उठवला पायजे."

" अर पर झोपलेल्याला उठवू ने. कुणीतरी माणूस ठेवा इथं आन् जागा झाल्यावर करा वासपूस ! "

पण तरण्या मंडळींना म्हाताऱ्या सोनाराचं सांगणं पटलं नाहीं.

गावांत अलिकडे चोऱ्यामाऱ्या फार होत होत्या. नवखा माणूस पारखून घेणं भाग होतं. नाहींतर फुकट दगाफटका व्हायचा.

सोनाराला उडवून लावून पोरानीं त्या पाव्हण्याला गदागदा हलवला. मोठमोठ्यानं हळ्या मारल्या,

" ह्य् पावणं, ओ...जागं व्हा, जागं व्हा. "

बराच गोधळ झाला तेव्हा पाव्हणा जागा झाला आणि उठून बसला. आजूबाजूला जमलेल्या पोराकडे एका डोळ्यानं बघूं लागला. पोर म्हणाली,

" काय राव, झोप हाय का स्वाग ? चार घंटं झालं, आम्ही हळ्या मारून मारून दमलो, तरी तुम्ही आपल गपच मेल्यावाणी ! " यावर पाव्हणा काहींच बोलला नाहीं. उशाचा पटका घेऊन नाकागळ्याला आलेला घाम पुसू लागला. दुखणेकऱ्यासारखा कण्हू लागला.

पोरानीं विचारलं,

" कोण गाव ? "

पाव्हण्यानं सावकाशीन उत्तर दिलं. त्याचा आवाज मेढरासारखा होता.

" लात्रचा आहे मी. "

" तरी पर नाव असलच की गावाला."

" लात्र तिकडं मैसूराकडं गाव आहे. सुमाशी ! "

पोराना भूगोल फारसा टाऊक नव्हता. गावाची विशेष चिकित्सा झाली नाहीं.

" कुणीकडं निघालाय ? "

" चाललोय् आपला असाच, पोटाच्या मागं ! "

" कां बरं ? दुकाळ हाय का तकडं ? "

" हा, पोटानं मरायला लागलो तर काय करायच आपल्या मुलखात राहून ! "

" नाव काय ? "

" उसेन. "

" जात ? "

"आपली हीच की, मऱ्हाठ्याची ! "



"आ? मग नाव हें असं कसं बरं? आमच्याकडं वैदू, म्हार लोकात असत हे नाव!"

पाव्हणा म्हणाला,

"आमच्या मुलकात मऱ्हाठ्यातहि असत!"

अशी बोलाचाली झाली आणि पाव्हणा पुन्हा मुरगळून झोपला.

पोरं म्हणाली,

"दमलंया वाटचालीनं. पोटालाबि मिळालं नसंल. पडूं द्या निवांत. सकाळच्यापारीं जाईल आपल्या वाटनं निघून!"

पण सकाळीं पाव्हणा निघून गेला नाहीं. देवळातच खुडूक कोंबडीसारखा बसून राहिला. संध्याकाळीं देवळात उजेड नसल्यामुळं त्याचा चेहरा नीट दिसला नव्हता. तो आता दिसत होता. त्याची डोकी फार वाढली होती. दाढीहि. चेहरा निबर होता. कपाळ व नाक याच्या मानानं तोंड, हनुवटी ल्हान होती. हनुवटी तर फार आत गेली होती. शिवाय एक डोळा पिचका होता आणि दातहि थोडेसे पुढं होते.

उन वर आल्यावर तो उठला आणि गावात भाकरी मागत हिंडूं लागला. कुणीं कोरनितकोर दिली ती घेऊन ओढ्याकाठीं गेला. भाकरी खाऊन वर गटागटा पाणी प्याला आणि पुन्हा जाऊन देवळात पडला. चार दिवस त्याचा हा क्रम चालू राहिला तेव्हा गावचा पाटील म्हणाला,

"अरं, हातापायानं धड असून भाकरी मागून का खातोस? काय कामधंदा कर!"

"मालक, शेतकींतल्या कामधंद्याची माहिती मला नाहीं. दुसरं काय काम तुम्ही द्याल तर करीन!"

शेतकीच्या कामाशिवाय खेड्यात काम कुठून मिळणार? पाटलानं आणि गावच्या चार मंडळींनीं विचार केला. गावात एकुलता एक गुरव होता तो गाव सोडून आपल्या सासुरवाडीला जाऊन राहिला होता. मारुतीच्या दिव्याची आणि पाण्याची व्यवस्था नीट होत नव्हती. तेव्हा पाटलान पाव्हण्याला विचारलं,

"देवाचं देऊळ सारवशील का? वेळेवर दिवा, पाणी करशील का?"

"करीन मालक!"

"मग कर, आन् गावात पीठ मागून खा!"

पाव्हणा गुरवकी करू लागला. सकाळच्या प्रहरीं तो लवकर उठे. गावकऱ्यानीं दिलेला धोतरतांब्या घेऊन ओढ्यावर जाई. स्वच्छ आंघोळ करून देवाला पाणी घाली. हातांत टोपलं घेऊन पीठ मागे. त्याची पीठ मागण्याची तऱ्हाहि

वेगळी. न बोलतां सवरतां तो आपला घरासमोर उभा राही. जेव्हा कोणी बघे तेव्हां कळे कीं, हा पीठ मागायला आला आहे. मग मूटभर पीठ त्याच्या टोपल्यात पडे. वाढणारी म्हणे,

"अर, गप् उभा का ऱ्हातोस ? हाळी देत जा. आमी वळखावं कसं तूं आलास हे ?"

पण त्यान आपला ठेका सोडला नाहीं. न बोलता तो पीठ गोळा करी. दोन्ही वेळेच्या जेवणापुरतं झाल की जास्ती घर मागत नसे.

देवळाच्या पाठभितीला आडोसा करून तिथं त्यान आपलं बिऱ्हाड केलं होतं. तीन दगडाच्या चुलीवर चार भाकरी भाजून तो त्या खाई. कालवण आहे नाहीं याची फिकीर करत नसे. दर शुक्रवारीं देऊळ सारवून लख्ख करीत असे. सध्याकाळी गाभाऱ्यात दिवा लागायचा कधीं चुकून ऱ्हात नसे. आपल काम बजावल्यावर गावात गटाळण्या घालीत तो कधीहि हिंडत नसे. फारसा कधी कुणाशीं बोलतहि नसे.

महिना पंधरा दिवस गेले आणि गावकऱ्याना नव्या गुरवाविषयीं आदर वाटूं लागला. दाढी वाढवलेला, आणि कुणाशी फारसं न बोलणारा हा माणूस खरोखरीच कुणीतरी देवमाणूस असावा अशी बोलवा उठली. लोक त्याला बुवा म्हणून हाक मारू लागले.

म्हातारा पाटील एकदा एकटाच घरीं असतांना बुवा पीठ मागायला गेला आणि टोपलींत पीठ पडलं तरी इकडं तिकडं रखारखा बघत राहिला. पाट-लाला काहीं कळेचना. बराच वेळ असा उभा राहिल्यावर बुवा पाटलाला म्हणाला, "मला एकातीं भेट."

आणि काय, कशासाठीं, हे न सागता निघून गेला.

पाटील मोटा बुचकळ्यात पडला. एकाती भेटण्यासारख काय काम आहे ? या विलक्षण माणसाला अस काय गुपित आपल्याला सांगायचयु ? आणि ते रात्रीच का ? एकातीं का ? तसं म्हटलं तर आतांहि मी इथं एकटाच होतो. मग तो इथंच का बोलला नाहीं ? आपला हा जुनापुराणा वाडा त्यानं असा रखारखा न्याहाळून का बघितला आणि कान कां टवकारले ? ही काय भानगड आहे ?

यात काहीं फसवाफसवी, डावसाव तर नाहीं ? पाटील हबकला ! पण जिज्ञासाहि दाबतां येईना. होय ना करता करता, मध्यान्‌रात्रीचा उठून तो बुवाकडे गेला.

भल्या मोठ्या लाकडाचा ओंडका पेटवून बुवा शेकत बसला होता. त्यानं नुसती लंगोटी लावली होती आणि अंगावर गोधडी पांघरली होती. पाटील गेला आणि बसला तरी तो काहीं बोलला नाहीं. वर डोळा करून त्यानं त्याच्याकडे बघितलंहि नाहीं. कसल्या तरी चिंतनात असल्यासारखा उगाच बसून राहिला होता. बाहेर गडद काळोख होता. थंडी अंगाचे चावे घेत होती. गाव गपू गार होत.

बराच वेळ बसला तरी बुवा बोलला नाही. तेव्हा जागच्या जागीं चुळबूळ करीत पाटील हलक्या आवाजात म्हणाला,

"मला का बोलावलं होतं, बुवा ?"

बुवा भानावर आला. डोळ्यांची चमत्कारिक उघडझाप करीत त्यानं आपली दाढी गोंजारली आणि तो कुजबुजला,

"तुला इकडं येताना कुणी बघितलं का ?"

"न्हाई !"

"मी बोलावलं आहे हे घरी बोललास का ? बायकोपाशीं, पोरापाशीं ?"

"न्हाई !"

"ठीक. तुला एक गोष्ट सांगतो ती खरी म्हणशील का ?"

"म्हणीन !"

"मारुतिरायाला साक्षी ठेवून सांगतो तें नीट ध्यानांत घे."

"हां !"

पाटील बसल्या बसल्याच पुढं सरकला. आणि कान देऊन ऐकूं लागला.

अगदीं हलक्या आवाजात बुवा म्हणाला,

"तुझ्या वाड्यात अपरंपार धन आहे. सोन्याच्या मोहरांनीं भरलेलं हंडं आहेत, रांजण आहेत. तुझ्या परसदारीं त्या पेरूच्या झाडापासून विहिरीपर्यंत एक मोठा चर खणला आहे. तो दगडचुन्यानीं बांधून घेतला आहे. त्याच्यावर

आडव्या पहारी टाकलेल्या आहेत आणि त्याना साखळदंड बांधून हे रांजण अधांतरीं सोडले आहेत. ”

पाटलाच्या छातींत कळ आली. त्याचं काळीज बेडकासारखं उड्या मारू लागलं. तसल्या थंडींतहि त्याच्या कपाळाला घाम आला. बुवाच्या या सांगण्या-वर काहीं बोलणं त्याला सुधारेना. वरचेवर मागंपुढं बघत तो गपच राहिला. अंगावरची गोधडी सावरून बुवानं मांड मोडली आणि पुन्हा तो नागासारखा डुलत बोलूं लागला,

“ जेव्हा जेव्हा मी पीठ मागायला तुझ्या घरीं येतो तेव्हा तेव्हा मला आवाज ऐकू येतो. पिंगळा बोलतो तसं तें बोलतं. मला विचारतं, ‘मी येऊं का ? मी येऊं का ?’ ”

“ असं ? ”

“ हा. त्याशिवाय मीं तुझ्यापाशी बोललो नसतो. आणि हे ध्यानात घे. ते धन तुला लाभण्यासारखं आहे.”

पाटलाला वेड्यासारखं झाल. त्याचा बुवाच्या सांगण्यावर विश्वासच बसेना. म्हणजे बुवा खोट बोलतो अस नव्हे; पण ते धन आपल्याला मिळणार ही गोष्टच त्याला पटेना. आपल्यासारख्या दळभद्याला हा सांटा कसा लाभणार ? एवढं बलवत्तर नशीब आपल्याजवळ कुठून असणार ? वाडा जुनापुराणा होता; पूर्वज मोठे तलवारबहाद्दर होते. कधीं कधीं भिती-कोनाड्यातून हत्यारेंपात्यारें निघत. वाड्याला खाली एक भुयारहि होत. वाड्यांत अमाप धन असणं ही गोष्ट मुळींच अशक्य नव्हती. पण तें आपल्याला मिळणार ?

एक घुटका गिळून पाटलानं विचारलं,

“ खरं म्हणता बुवा ? तें मला लाभंल ? सगळं ? ”

“ अरे हा, तुला लाभल. मी तुला तें मिळवून देईन ! ”

“ खरं म्हणता बुवा ? तसं जर कराल तर त्यातला पाव हिस्सा तुम्हाला दीन—मारुतीची आण. मी लबाडी करणार नाहीं ! ”

पाटलाच्या या काकुळतीच्या बोलण्यावर बुवा थोडका हसला. म्हणाला,

“ देशील तेव्हां दे. तूर्त तंबाखू तरी काढ. ”

पाटलानं तत्परतेनं पिशवी काढून बुवाला चिमूट दिली. आपण खाल्ली. कांहीं वेळ दोघंहि गप झाले.

इतका अपरंपार पैसा मिळाल्यावर ?...पाटील फार बडा माणूस झाला. गावात त्यानं राजवाडा बांधला. आरसेमहाल केला. उत्तम प्रतीचे घोडे ठेवले. नोकरचाकरांची रेलचेल केली. सोन्याच्या ताटात वाढलेली पंचपक्वान्नं तो चवीनं खाऊ लागला, तेव्हां रूपवान दासी त्याला वारा घालूं लागल्या. मोत्याचा तुरा लावलेलं पागोटं घालून, हातातली सोन्याचीं कडी वाजवीत तो घोड्यावरून निघाला, तेव्हा स्वारी बघण्यासाठीं दारादारातून बायका उभ्या राहिल्या. त्यातली एक रूपवान् बाई त्याला आवडली तेव्हा शिपाई पाठवून त्यान तिला वाड्यात आणवली आणि आपली पट्टराणी केली...

तोंडातला गुळणा थुकून, मिशा साफ करीत बुवा म्हणाला,

" पण त्याअगोदर तुला त्या धनाला खाजं द्यावं लागंल ! "

पाटील नंदीबैलासारखी मान हलवीत म्हणाला,

" तर, तर, त्याबगार ते कुठलं मिळायला ? आता काय काय करावं ते तुमी सांगा, म्हंजे मी करतो ! "

बुवानं थोडका विचार केला आणि सांगितलं,

" एक आखी कोंबडी, नुसती तळलेली, बारा चपात्या, लिंबू, आणि दारूचा मोटा शिसा रात्रीं परसदारीं ठेव आणि गप्‌गार झोप. जा, उठ, मला आता झोप आली. उठ ! "

पाटलाला धुडकावून लावून, बुवा मुरगाळून पडला. गोधडींत शिरला.

फटा फटा जोडा वाजवीत, अंधारातूनच, पाटीलहि वाड्यांत आला आणि गपचिप झोंपीं गेला. उद्या रात्रींच्या 'खाजा'ची व्यवस्था करण्याचं त्यानं निश्चित केलं.

सकाळीं उठून पाटलानं तालुक्याला माणूस धाडला आणि दारूचा शिसा आणला. घरातली कोंबडी सोलली आणि पाटलिणीकडून तळून घेतली. बारा चपात्या करून घेतल्या. त्याला चपचपीत तूप लावलं. पाटलीण म्हणाली,

" हे कशापायी ? कुणी अम्मलदार येणार हाय का ? "

तेव्हां पाटील तिच्यावर ओरडला,

" तू गप. कर म्हणल्यावर करव. अगावू अक्कल दाखवू नये ! "

विचारी पाटलीण गप राहिली. सगळा मालमसाला करून तिन रात्रीं जय्यत तयारी ठेवली.

रात्रीं चांगला काळोख पडल्यावर, बायकोला, पोराला झोप लागल्याची खात्री करून घेऊन पाटील उठला आणि खाज परसदारीं ठेवून गपचिप झोपला.

दुसरे दिवशीं सगळं साहित्य नाहीसं झालं होतं. कोंबडीचीं हाड किंवा मोकळी बाटलीदेखील राहिली नव्हती ! पाटील मनीं संतुष्ट झाला. म्हणाला,

" ठीक, धनान खाज घेतल ! "

रात्रीं बुवाकडे येऊन त्यान ही सगळी कथा त्याला सांगितली तेव्हां बुवा म्हणाला,

" तुला धन मिळणार यात संशय नाही ! "

अधीरतेनं पाटलान विचारलं,

" मग कुठं आन् कधीं उकरूं ? "

" थोडका थांब. अता उतावळा होऊं नकोस. एवढ्यान भागल नाहीं. अवसेला अजून चार दिवस अवकाश आहे. तोपर्यंत खाजं तिथं ठेव आणि आणखी काही गोष्टी मला करायच्या आहेत त्यासाठीं पन्नासभर रुपये मला दे ! "

पाटील मुळींच कुरकुरला नाहीं. घरातले पन्नास रुपये आणून त्यानं बुवाच्या हातावर ठेवले आणि अवसेपर्यंत ' खाज ' ठेवण्याचा नियम पाळूं लागला.

अवसेच्या रात्रीं फावडं कुदळ घेवून पाटील बुवाकडे गेला आणि म्हणाला,

" चला. का मी एकटाच उकरूं ? "

" ते का ? मी येतो कीं बरोबर. हे बघ, बरोबर पेरूच्या झाडाखाली खोद. बराच खाली गेलास म्हणजे तुला एक भला मोटा नाग दिसल ! "

" नाग ? "

"हा नाग. पिवळाधमक. आणि त्याच्या अंगाचा घमघमाट सुटंल!"

"पर मग—त्यो हात कसा लावूं देईल पैक्याला?"

"त्येची काळजी करूं नकोस. मी बंदोबस्त केलाय्. चल."

अवसेच्या अंधारातून बुवा आणि पाटील वाड्याच्या परसदारीं गेले. पेरूच्या झाडाखाली येताच फावड कुदळ खाली ठेवून पाटलान काकडा पेटवला आणि मातींत पुरून ठेवला. धनाची जागा दाखवून बुवा म्हणाला,

"हाण कुदळ."

धोतर खोचून पाटलानं कुदळ हाणली. काकड्याच्या प्रकाशानं आणि कुदळीच्या आवाजानं पेरूवर बसलेली पाखर अर्धवट जागीं झाली आणि ओरडून फडफडली.

पाटील सणसण कुदळ मारीत होता आणि बुवा फावड्यान माती ओढीत होता. न बोलता सवरता त्याच काम चालल होत.

परसातल्या गवतातले किडे काकड्यावर झेपावत होते. ते जळत तेव्हा तटतट आवाज होई आणि जळका वास पाटलाच्या नाकपुडींत शिरे. कपाळावर आलेला घाम वरचेवर पुसून तो कुदळी मारीत होता. बुवा माती ओढत होता. आता खड्डा चांगला कमरेइतका झाला होता. आत उतरलेला पाटील घाव घालण्यासाठीं वाकला म्हणजे वरून दिसत नव्हता. ओलसर आणि कुबट वासाची माती, खडे याचा ढीग पडला होता त्यात बुवा गुढग्याइतका रुतला होता. एखादे वेळीं कुदळ दगडावर जाई आणि खाण्कन आवाज येई. तेव्हा बुवा इषारा देई,

"सबूर, सबूर. घाई का?"

ओल्या मातींतून दानवी, गोमी बाहेर पडत आणि पाटलाच्या उघड्या नडग्यावर चढत तेव्हां तो जोरानं तंगड झाडी. असा प्रकार बराच वेळ चाल-ल्यावर बुवा एकाकी म्हणाला. "शाब्बास, वर ये, वर ये."

कुदळ थांबवून आणि खड्डयातून मान वर करून पाटील बघूं लागला. तेव्हां बुवान भला मोठा नाग शेपटाला धरून त्याच्या नाकासमोर आणला. पाटील भ्याला आणि 'भुक्' करून मागं सरला तेव्हा बुवा म्हणाला,

"भिऊ नकोस. मेलेला आहे. माझ्या मत्रानं मी याला आंतल्या आत मारला होता. उकरण्याच्या नादात तो तुझ्या कुदळीला अडकून वर आला आणि माझ्या फावड्याला लागला. बघितलास, या धनाचा मालक, राखणदार?"

आकारानं पिढरीसारखा असलेला तो प्रचड नाग बुवान डोक्याच्यावर हात करून लोंबकळत खाली सोडला होता तर त्याचं डोकं जमिनीवर वीतभर लोळत होत.

"बघ, मी सागितल त्याची प्रचीति आली का?"

पाटलान होकारार्थी मान हलवली.

"मग, खोद. खाली धन आहेच बघ!"

पाटील खोदू लागला. पण तोंपर्यंत भली पहाट झाली. माणसाचा सावट येऊं लागला. तेव्हा बुवा म्हणाला,

"आता पुरे कर. उद्या रात्रीं खोद. माझ काम सपल. मी आता पुन्हा येणार नाही. तुझ तू काढ."

आणि तो निघून गेला.

दुसरे दिवशीं रात्रीं काकडा पेटवून पाटील एकटाच खोदू लागला. पण त्याला फार खोदाव लागल नाहीं. आडव्या टाकलेल्या पहारीला साखळीन बाधलेला राजण त्याला लागला. काकडा जवळ करून पाटलान झाकण उघडलं आणि आत पाहिल.

सगळा राजण चिप्यानीं भरला होता! जुन्यापान्या, कुबट आणि मळक्या चिप्यानी!

बुवा नाहीसा होऊन चार आठ रोज झाले होते. सध्याकाळच्या वेळीं मडळी देवळात बसली होती. मुरा कुंभार म्हणाला,

"बुवा मोटा चमत्कारिकच माणूस होता. आला काय गेला काय! कुणाला पुसलं नाहीं, विचारलं नाहीं! केव्हां आणि कुठं गेला, राम जाणे!"

म्हातारा सोनार म्हणाला,

"पण तो काही साधासुधा माणूस नव्हता. ज्ञानी योगी असला पाहिजे!"

भगा शिंपी म्हणाला,

" असल बाबा. जायाच्या अगुदर आठचार रोज माझ्याकड आला आन् भल्या मोठ्या बोचक्यात जुन्या फाटक्या चिंध्या घेऊन गेला ! "

तळखड्याला टेकून बसलेला पाटील एकाएकी दचकला.

" खर म्हणतोस का भगा, चिंध्या तुझ्याकडनं घेतल्या ? "

" हा तर. खोट कशापायीं सागू ? "

मुरा कुंभारालाहि एकाएकीं आठवण झाली,

"हा, माझ्या जवळनंसुद्धा एक जुना राजण घेऊन गेला एकदा. मोटा चमत्कारिक माणूस ! मी विचारल, हे कशाला बुवा ? तर काहीं बोलला नाही ! "

पलिकडे बसलेला रामा माळी सावरून पुढ आला आणि त्यान आपला अनुभव सागितला,

"आमच्या मळ्यात आमी नाग मारला एक भला मोठा, तर तोसुद्धा बुवानं मागून नेला. काय केल त्येच कुनाला ठाव ! औषधपान्यासाठी नेला म्हणाव काय तर ? "

पाटील हे सगळ ऐकून काळाठिक्कर पडला. बुवा गेला तरी तो अजून रात्रीं अपरात्रीं उठून परस उकरीत होता. धन जागा बदलत म्हणून ठिकठिकाणीं खड्डे घेत होता. घाबऱ्या आवाजात त्यान रामाला विचारल,

" किती दिस झालं या गोष्टीला, रामा ? "

रामा म्हणाला,

" आठ बारा रोज असत्याल ! "

# भुताचा पदर

कुलकर्ण्याची 'पाळी' यायच्या अगोदर नाना बामण फार गरीब माणूस होता. इतका गरीब की, त्याच्या बायकोच्या अंगावर धड सुडक नसे. पोरंबाळं, कुत्र्याच्या पिलासारखी गावभर हिंडत. दोन दोन दिवस घरीं चूल पेटत नसे. मग ती माउली चोरून मारून घर हिंडे. आत्याबाई, सासूबाई म्हणून कुरवाड्याच्या बायकांपाशीं आपली अडचण सांगे, तेव्हा त्याना कणव येई. आडोशाला बसवून त्या पोरांना जेऊ घालत. कारण इतर भाऊबंदाना हे कळलं तर ते नांव ठेवतील, नानाच्या बायकोनं पोरं आपल्या हातानं बाटवली म्हणतील म्हणून. असा एकंदर त्याचा संसार होता. अठरा विश्वे दारिद्र्य असलेला. लाचारीचा. नाचार.

नाना हा खरा वेरकी माणूस. हुषार डोक्याचा. कुलकर्ण्याचं पिल्लूं शोभणारा. पण या परिस्थितीच्या त्रासानं, शनीच्या फेऱ्यानं तोदेखील कुचंबला होता. आपल्या परीनं तो खूप लटपटी करत होता. पण त्याला यश येत नव्हतं. त्याची हुषारी कामी येत नव्हती. त्याला शनीदेवानं पेचात धरला होता. जमिनी नीट पिकत नव्हत्या. गावात कुणी पैपैसा उसना देत नव्हतं. कुणी शब्द मानत नव्हतं. नाना वाघासारखा असून कुत्र्यासारखा जगत होता. खरोखर कुत्र्यासारखा.

पण अशीं सात आठ वर्षे गेली आणि आणेवारीप्रमाणं त्याच्याकडे कुलकर्णीपणाची पाळी आली! पाच वर्षांची पाळी. आणि त्या बहाद्दरानं एकदम पलटं खाल्ली. बोकांडीं बसलेल्या गरीबीला झिंजाडून टाकली. गावावर दबदबा ठेवला. कुणी शब्दाच्या बाहेर जाता कामा नये असा बंदोबस्त केला. पाटलाला आपल्या हातातलं बाहुलं केलं आणि लक्ष्मीचा पदर ओढून तिला घरांत आणली. गाजरासारखा लाल, बोक्यासारखा गुबगुबीत नाना, परसदारीं जानवं घोळीत उभा राहिला म्हणजे जाणारायेणाराला त्याच्या कडसोरीला रुपयाची वीतभर लांब चवड लागलेली दिसूं लागली.

पाच वर्षांच्या कारकीर्दीत नानान कडेपाट, चौसोपी वाडा बांधला. दोन मळे उभे केले. सात आठ गुरढोर केली. पोराबाळांचीं लग्नं केली, मुंजी केल्या. दहावीस तोळे सोनं केलं. हा हा म्हणता, बघता बघतां दिडकीला महाग असलेला नाना चांगला गबरगड झाला.

नानान अशी माया केली तेव्हा साहजिकच ती लोकांच्या डोळ्यावर आली. वर्षाला पाऊणशें रुपये सरकारी पगार धरला, खरेदीपत्राचे पन्नासभर रुपये धरले आणि इकडे तिकडे चिरीमिरी मिळाली तरी निव्वळ यावर नानान एवढी माया कशी केली? यातल खरं मर्म काय आहे? आणि मग सारं गाव बोलू लागल कीं, नानानं लाचलुचपत बक्कळ खाल्ली. दुष्काळीन वसुलीची रक्कम गिळली. सारा अनीतीचा पैसा केला! हा गवगवा इतका झाला कीं, त्याचे पडसाद सरकारदरबारीं गेले. आणि नानाच्या बैठकीला धोका उत्पन्न होण्याचीं लक्षणं दिसूं लागलीं.

चारचौघाच्या बैठकींत एकवार हा विषय निघाला. त्यात नाना होता. आबानाना होते. गणा चलपते होता. बंडा कुळकर्णी होता. रात्रीं नऊदहाच्या सुमारास मारुतीच्या कट्ट्यावर ही बैठक बसली होती. लाच खाण्याचा विषय निघाला तेव्हा, हातांतली विडी जमिनीवर चुरमाडीत नाना म्हणाला,

"हा माझ्यावर फुकट आळ आहे. मी लांच खाल्ला. पण जे मिळवलं तें सगळच लाचाचं नाहीं!"

यावर बंडा बोलला,

"गड्या, या बोलण्यात चव नाहीं! तुझ्यासारखी कुलकर्णीपणाची पाळी आम्हालाहि आली; पण दहा तोळं सोनच काय, पण लोखंडसुद्धा नाहीं सापडायचं आमच्या घरात तुला!"

हनुवटीला झोले देत आबानाना म्हणाले,

"गावात बोललं जातं ते खोट कस नाना? लाच जर खाल्ली नाहींस तर इतकी माया तू कशी केलीस? तुला कुठं घबाड सापडलं? का एखाद्या बेवारशी बाईची इस्टेट मिळाली?"

"आबा, तुम्ही खर म्हणा खोट म्हणा, पण मी रक्कम मिळविली ती लांचावर नव्हे. ती भानगड निराळी आहे. तुम्ही ऐकत असाल तर सांगतो."



"सांग कीं, आम्ही ऐकून घेऊं पटलं तर, नाहीतर सोडून देऊं!"

"तुम्ही म्हणाल कीं मी ही गोष्ट बनवून सांगतोंय्. पण मारुतीच्या समोर बसून सांगतो कीं माझी भानगड निराळी आहे. तुम्हांला न पटणारी आहे!"

"अगोदर सांग तर खरं. पटणं न पटणं मागून बघूं!"

मग नाना जाम मांड ठोकून सांगण्याच्या पवित्र्यात बसला. आबानानांनीं

डोईचा पटका कमरेमागं ठेवून खांबाचा आधार घेतला. बडा कुळकर्णी खालीच लवडला आणि गणानं नवी सिगारेट पेटवली.

गावात सामसूम झाली होती. बाहेर झकास चांदणं पडलं होतं. वारा शांत होता. इतका वेळ देवळाच्या गाभाऱ्यातून फडफडणाऱ्या, चिरकणाऱ्या पाकोळ्याहि शांत होत्या. सगळं वातावरणच तटस्थ होतं.

पायाचा तळवा चोळीत चोळीत नाना बोलू लागला. त्याचं बोलणं गाण्यासारखं होतं. पातळ, मऊ आणि ठेका असलेलं.

" दोन तीन वर्षांपूर्वी, म्हणजे एकोणीसशें सत्तेचाळीसची कथा. त्याच साली पाळी माझ्याकडं आली. तेव्हां जीव थोडका भांड्यात पडला. म्हटलं, आता थोडी घडी बसेल. निदान पोरबाळं दोन वेळा पोटभर जेवतील तरी. बायकोच्या अंगावर नीट लुगडं तरी घालता येईल. हालअपेष्टा फार काढल्या; आता थोडे बरे दिवस येतील. बायकोहि आनंदली. पौषी पौर्णिमा जवळ आली होती. खरसुडीची जत्रा भरायला सुरवात झाली होती. बायको म्हणाली, ' जत्रेला जा. नाथाच्या पायावर डोकं ठेवा. रुपायाभराची भाग घाला.' मी होकार दिला. म्हटलं, तिची श्रद्धा कशाला दुखवा ? नाथाला जाऊन येऊं. सकाळच्या प्रहरीं बायकोनं भाकरी बांधल्या. मी जाऊन आपल्या बाबा कुंभाराचं घोडं घेऊन आलों. त्यानं ताकीद दिली कीं, तुमी मागताय् म्हणून जनावर देतों कुळकर्णी, पर उद्या सकाळीं इथं आणून मला द्या. का ? तर मला सकाळी बाजाराला जायाचं हाय्. माझी गरिबाची पाच दहा रुपयाची कमाई बुडंल. मी त्याला होकार दिला आणि घोड्यावर खोगीर घालून घरीं आलों. कोटटोपी घातली. कडमोरीला दोन रुपये लावले आणि रस्ता सुधारला.

वाटेनं चिक्कार जत्रा चालली होती. गुरढोरं घेऊन जत्रेकरी खरसुडीकडे अजूनहि जात होते. त्याचे पाय धुळीनं भरले होते. शरीरं शिणली होतीं. तरी डोक्यावर कडबा आणि पाठीशीं चार दिवस पुरतील इतक्या भाकरी बांधून जनावरांना छपाट्या मारीत ते चालले होते. गेले चारपांच दिवस रस्त्यावरून हजारानीं गुरं गेल्यामुळं धुरळा अतोनात झाला होता. रस्त्याकडेच्या झाडाझुडपावर त्याचे थर बसले होते. शेणाच्या पोवट्या आणि चिपाडं जागजागीं पडलीं होतीं.

वरचेवर तोंडावर बसलेला धुरळा पुशीत मी घोड दामटीत होतो. कुंभाराघरीं राहूनहि ते जनावर चांगलं चलाख राहिलं होतं. शेपटाची दांडी हलवीत, आणि वाटेवर दिसणाऱ्या भाईबंदाकडे बघून खेकाळत झपाट्यान चालत होत. दरमजल दरकोस करीत जेवणवेळेच्या सुमारास मी मुक्कामावर पोचलो.

जत्रा चिक्कार भरली होती. जिकडे नजर फेकावी तिकडे ढोराचा दर्या दिसत होता. नाना जातीच जनावर विक्रीसाठीं आल होत. गायीबैल, घोडीगाढवं, शेळ्यामेंढ्या, रेडेम्हशी. गिऱ्हाइकाची तोबा गर्दी उसळली होती. हातात कानाइतक्या उंच काठ्या घेतलेले हेडे लोक मोटमोठ्यानं सौदे करीत होते. जनावराच ओरडण आणि माणसाची गवगव याचा एकच कालवा होऊन राहिला होता. धुरळा आणि जनावराच शेणमूत याचा दर्प, माणसाचे उबट श्वास यामुळ ते सगळं वातावरण कुंद झालं होत.

जत्रेच्या कडेला लागून मिटाईवाल्याचीं दुकानं होती. चिरमुऱ्याचे भोत उघडे ठेवून, माडावर ठेवलेल्या पेढेबर्फीच्या ताटाकडे लक्ष देत शेटलोक बसले होते. जत्रा अद्याप ओसरू लागली नव्हती, त्यामुळ त्याच्या दुकानी गिऱ्हाइकाची असावी तितकी झिम्मड नव्हती. त्याना लागूनच हॉटेल होतीं. रंगीबेरंगी कागदाच्या कातरकामानीं बाबू मढवून हॉटेलवाल्यानीं मोठा थाट केला होता. भट्टीसमोर बसून घामाघूम झालेली पोर, झिज्या सावरीत भजाचे घाणे काढीत होती. मुडाशेशेमलेवाली मंडळी बाकड्यावर बसून चहा पीत होती. गल्ल्यावरला बुवा धडाक्यानं फोनो वाजवीत होता. तो ऐकत पोरटोर उभी होती."

इतका वेळ लोळत पडलेला बंडा सावरून बसला आणि त्यानं नानाला विचारलं,

"मग जत्रंत एखाद नोटाच पुडकं सापडल का काय तुला, नाना?"

नानान नकार दिला.

"नाहीं नाहीं, तूं ऐकून तर घे. आबानाना, डोळं पेंगायला लागल काय? गणुबा, पेटवा दुसरी शिगारेट!"

पण मंडळी पेंगायला लागली नव्हतीच. आरामान देह पसरून, नानाची कथा ध्यान देऊन ऐकत होती. पाठीचा पटका चाचपीत आबानाना म्हणाले,

"झोप उडालीया आता. ऐकतोय आमी. तुमी सागा."

आणि नाना सागू लागला,

"या सगळ्या गोंधळातून मी थेट देवळाकडे गेलो. बाहेर असलेल्या ओळखीच्या दुकानदाराकडून नारळ, कापूर, गुलाल घेतला. घोडं तिथंच गुंतवलं. आणि गर्दीतून धक्काबुक्की करीत दर्शन घेतलं. नाथबाबाला साष्टांग नमस्कार केला. म्हणालो, देवा ! ही तुमची कृपा आहे. माझ्या गरिबाकडे तुम्ही बघितलं. मला कुळकर्ण्याचं काम मिळालं. माझी पोरंबाळं आता सुखानं जेवतील. भगवंता, अशीच कृपा सदोदित असू द्या म्हणजे गंगाड झालं ! भागेसाठीं गुरवापाशीं एक रुपया दिला. त्यानं प्रसाद दिला तो पिऊन बाहेर पडलो. या वेळपर्यंत भूक लागली होती. दुकानदाराकडून तांब्या घेतला आणि विहिरीचं पाणी आणलं. त्याच्या ओसरीवर बसून भाकरी खाल्ली आणि चैनीनं जत्रा बघूं लागलो.

हा बैल बघ, तो बैल बघ, घटकाभर गारुड्याचा खेळ बघ, दुकानापाशीं उभा रहा, हॉटेलांत चहा पी, असं करता करता दिवस मावळून गेला. हॉटेल-वाल्यानीं बत्त्या पेटवल्या. बेफाम थंडी सुटली. जत्रेत जागजागीं चिपाडं पेटवून मंडळी शेकत बसली. मी सटक्यानं परत फिरलो आणि दुकानदाराचा निरोप घेऊं लागलो, तेव्हा तो बोलला,

'भले कुलकर्णी ! अहो, जत्रेची गम्मत बघा रात्रच्या रात्र आणि सकाळीं जा ! तुमच्यासारख्या रंगेल गड्यानं असं करून कसं चालायचं ?'

'तसं नव्हे, पण गेलं पाहिजे. दुसऱ्याचं घोडं आणलंय् तें परत केलं पाहिजे सकाळीं. आणि घरीं मंडळी वाट बघतील.'

'छे छे, एका रात्रीनं काय खोळंबा होतोय् त्या घोडंवाल्याचा ? कुठं लढाईवर तर जाणार नाही ? अहो, रात्रीं शिनेमाफिनेमा बघा, वाटलं तर तमाशाला चला आन् सकाळीं लवकर उठून पिटाळा घोडं. मी काय नाहीं म्हणतोय् काय ?'

'नाहीं पण—'

'आता पुरे झालं ओढून धरणं ! कितीक दिवसांनीं गाठ पडलीया रात्र. असं कसं ?'

नाहीं होय करतां करता राहिलों. सध्याकाळी जेवून खाऊन शिनेमाला गेलों. तंबू चिकार भरला होता. पुढची जागा बघून आम्ही घोगडं अंथरल आणि माड ठोकला. खेळ तुकारामाचा होता. तो बघता बघता माझं डोळं जागजागी ओलं झाल. खरीं तर तीं पडद्यावरचीं चित्र; पण जणूं काय सगळं प्रत्यक्ष घडतं आहे, आपण बघतों आहो अस वाटल. अखेर रात्रीं बाराच्या सुमाराम खेळ सपला. माणसाच्या लोंढ्याबरोबर वहात आम्ही दुकानापाशीं आलों. बाहेर बाधलेल कुंभाराच घोड डोळ मिटून उभ्याउभ्याच झोप घेत होत. गारठ्यानं काकडलेली बोट चोळीत मी म्हणालों,

' बराय्, आता मी निघतों. मला परवानगी द्या ! '

' आ ? अहो मध्यान् रात्र झाली. आता कुठ जाता ? सकाळी लवकर उठून जा. '

' नको नको. कुंभाराला शब्द दिला आहे. तो मोडला तर पुन्हा आपली पत राहणार नाहीं. मला जाऊं द्या ! '

' पण रात्रीच ? सोबतीला तरी कुणी बघा ! '

' काय करायची सोबत ? चादण पडलंय् उन्हासारख. आत्ता जाईन घोड्यावरन वाऱ्यासारखा. तुम्ही काळजी करू नका. '

' बर, तुमच्या मनासारख होऊ द्या. जपून जा म्हणजे झाल. वाटंत चोराचिलटाच भय आहे. '

' चोरानीं लुटायला आपल्याजवळ आहे काय ? चार पैशाचं डाळचुरमुर पोराना खायला घेतलेत ते ? का तबाखुची पिशवी ? '

' अहो, पण, चार टणके तरी मिळतील फुका ! '

' मिळू द्या. कुलकर्ण्याचं काम करायच तर त्यालाहि अंग सरावलं पाहिजे ! '

मी असा नेट धरल्यावर दुकानदारानं पुन्हा मोडता घातला नाही. जपून जाण्याविषयीं मला वरचेवर बजावून त्यान दुकानाच्या फळ्या लावून घेतल्या. आणि नाथबाबाचं स्मरण करून मी रिकिबींत पाय ठेवला. कुंभाराच घोड दुडक्या चालीनं वाट कातरू लागल.

गावाबाहेर पडताच मोकळ्या रानातला वारा अंग चिरू लागला. माझी ताबडी घाबळी मी अंगावर लपेटून घेतली. तंबाखू तोंडात धरली. आणि आजुबाजूला मुळीच न बघता नजर समोर ठेवली. रात्री जाण्यायेण्याचा सराव होताच. त्यामुळ भीति फारशी वाटत नव्हती. तरीपण आजुबाजूला माणूसकाणूस नसताना ती भकास वाट ओसरता ओसरेना. आणि काळजात धाकधुक होऊ लागलं. पुढ माग बघायच नाही अस ठरवल होत, तरी घोड्याच्या टापाच्या आवाजान मन चाळवायच आणि डोळ्याच्या कोपऱ्यातून मी मागं बघायचा. तसा मी धीट आहे बर का बडा, पण चोरचिलट म्हटल कीं, माझा धीर सुटतो. अहो, त्या लोकाना काळीज नसत. चार कुऱ्हाडीचे घाव हाणले आणि तुकडे करून टाकलं म्हणजे करा काय? फुकाफुकी पोरबाळ वनवाशी व्हायचीं. म्हणून मागपुढ बघत होतो आणि वरचेवर घोड्याला दबावीत होतो. ते बिचार आपल्या परीन जलदीन जातच होत. पण मला वाटत होत त्यान वाऱ्यासारखं जाव.

अस करता करता पाटींत आलो. दोन्ही बाजूनी शेरचिचाच दाटवण लागलं होत आणि तशा चादण्यातहि वाटेवर काळोख पसरला होता. त्या काळोखात शिरून चार आठ पावलं जातो न जातो तोच घोडं एकाएकीं बुजलं. दोन्ही पाया-वर खडं उभ राहिल! मी बसणारा पट्टीचा. नाहींतर खाली कोसळून जायबदीच व्हायचो. लगाम ओढला, चुचकारल, तरी ते तोंड फिरवून मागंच फिरू लागल. काहीहि केल तरी ऐकेना. तरी मी जाम खालीं म्हणून उतरलो नाहीं. पायाची मिठी घालून वरच राहिलों. आणि मग एकाएकीं डोक्यात विचार आला कीं, ही भूतचेष्टा तर नाहीं? हा विचार आला रे आला आणि समोर एक पाढरी शुभ्र बाई उभी राहिली. डोक्यावरनं पदर घेतलेला. कपाळावर ठळक कुकूं. गोरीपान आणि सडपातळ. त्या क्षणीं मी ओळखलं कीं हें काम वेगळंच आहे. रात्री अपरात्री बाबाच्या भेटीला निघालेली ही कुणी आबा नव्हे. हिच्या तडाख्यातून निसटल पाहिजे. आणि खालीं मान करून घोड्याला अशी टाच दिली कीं, ते बेफाम उधळलं. उधळलं तें चागलं मैलभर. मैलभर आलों ही जाणीव झाली आणि मग मी थोडासा दम घेतला. वाटलं कीं, आता धोका टळला. लगाम सैल सोडला. घोडं दमगीर होऊन मुतत उभ राहिल. आणि असा श्वास घेतों तों मागून मंजुळ आवाज आला,

'अहो, असं पळता काय ? थोडे थांबा. मलाहि यायचं आहे. घेऊन चला मला!'

मग मी काळीज धट केलं आणि मागं न बघता म्हणालो,

'बाई, मी पोराबाळाचा बाप आहे. लक्ष्मीसारखी बायको घरीं आहे—'

'मग? मीहि काहि अशी तशी नाहीं. चांगली कुळाशिळाची आहे. आणि मला तुझ्या घरांत येऊन काय करायचं आहे? चार मैलावर जायचं आहे, तिथपर्यंत घोड्यावरून ने आणि सोड.'

'पण कुणी बघितलं तर काय म्हणलं?'

'मी काहीं तुझ्यापुढं बसत नाहीं. मागं बसते. नाहीं म्हणूं नकोस. आणि जरी म्हणालास तरी मी आल्याशिवाय सोडणार नाहीं!'

आणि आबानाना, ती बाई टाणूकन उडी मारून बसली माझ्यामागं!"

आबानाना उठून बसले आणि त्यांनीं विचारलं,

"आन् मग रं नाना?"

"मग काय, नाईलाज झाला. मुकाट घोडं हाकूं लागलों. तिचा मऊसूत पदर वाऱ्यानं पार माझ्या बगलेंत येऊन फडफडत होता. तिच्या अंगाचा घमघमाट सुटला होता—अत्तरासारखा. घोड्यानं ठोकर खाल्ली कीं तिचा माझ्या अंगाला धक्का लागायचा. थंडगार अंग तिचं. जणूं बरफ.

मग कुणी बोललं नाहीं का काय नाहीं. गप्‌चिप्. घोडं सटक्यानं चाललं होतं. माझ्यामागं भूत बसलंय् हे आतां मला पक्कं कळून चुकलं होतं. आतां एखादा ओढा येईपर्यंत ते माझ्यामागून उतरणार नव्हतं. कारण भूत पाणी ओलांडून पुढं येत नाहीं हे मला ठाऊक होतं. खरसुडीची वाट माहितीची होती. कुठं ओढा आहे, कुठं नदी आहे हे पक्कं स्मरणांत होतं. चांदण्यानं सगळ्या खाणाखुणाहि कळत होत्या.

मग ओढा येईपर्यंत उगीच बसलों. हलकेच खिशांतून अडकित्ता काढला आणि असा ओढ्याचा काठ आला, 'अरे, थांब थांब. मी उतरते—' असं ती म्हणाली, तोंच मी चलाखीनं माझ्या बगलेंत आलेला तिचा पदर कापला आणि

बेशक घोड पाण्यात घातलं. थाड्थाड् पाणी उडवीत घोड्यानं ओढा पार केला तसा त्याला पुन्हा असा फटकारा लगावला कीं ते वाऱ्यासारखं सुटलं."

गणा चलपते तोंड उघडं ठेवून हा प्रकार ऐकत होता. त्यानं विचारलं,

"आणि ती बाई हो कुळकर्णी ?"

"बाई उतरली होती ओढ्याच्या ऐलतीरावरच. तिचा पदर मात्र हिकमतीन कापून आणला मी घरीं आणि ठेवला तुळईंत बंदोबस्तान. आणि तेव्हापासून बघा माझं घर भरल !"

नानान गोष्ट संपवली. मंडळी घटकाभर गप्प बसली. जणूं गोष्टींतल्या त्या सगळ्या वातावरणातच ते अजून होते. सगळ्याना गोष्ट कळली, पण गणा चलपत्याच्या ध्यानीं त्यातलं मर्म आल नाही. तेव्हा आबानानानीं खुलासा केला.

"त्याचं असं असत गणा, भुताचा पदर आणला कीं, तें सारखं माग लागतं. म्हणत, माझा पदर दे. मग त्याला म्हणायच, माझ घर बाधून दे, मग देतों पदर. मग घराला लागण्यापुरती रक्कम त आणून देत. तेवढ काम झाल आणि भूत पुन्हा पदर मागू लागल कीं म्हणायच, माझ्या पोरीच लगीन होऊ दे—अस सारखं करायच आणि नानावाणी गबरगड व्हायच !"

गणाला गोष्ट पटली. तो म्हणाला,

"नाना, भुताचा पदर आणला ही तुमची बहादुरी ! अहो, आता तुम्हाला काय करायची आहे कुळकर्ण्यांची नोकरी ? खुशाल घरीं बसा. दारात हत्ती झुलंल तुमच्या. अत्तराच दिव जाळाल तुम्ही !"

तेव्हा नाना कष्टी मुद्रा करून म्हणाले,

"नाहीं रे गणा. तस असत तर लाच खाल्ली असा बोभाटा झाल्यावर कशाला भ्यालो असतों ?"

"का बर ?"

"गाधी भोंवला रे गणा, गाधीबाबा भोंवला ! परवाच्या जाळपोळींत माझं जें घर जळलं त्यात तो पदरहि जळला !"

# कुत्री

देवळाशेजारच्या पारावर गप्पा हाणीत बसलेली पोर उशीरा उठली आणि आपआपल्या घराकडे गेली. धड अंधारहि नव्हता, धड उजेडहि नव्हता. रात्र बरीच झाली होती. फिक्कट दिसत होत.

मोठ्या वहाणा वाजवीत रामा आपल्या घराकडे येत होता. त्याच घर थोडस एका बाजूला होत. पडल झडल होत, पण त्यातच चार खण इमारत उभी ठेवून रामा रहात होता. तो, त्याची म्हातारी आणि एक सुरेख कुत्री. शिवाय गुरंढोर, कोंबड्या, मांजरं. आपल्या देखण्या कुत्रीवर रामाचा विशेष जीव होता. गावातील चांगल्या कुत्रींत तिची गणना होत होती. भाद्रपद असल्यामुळें तूर्त तो तिला घरात डाबून ठेवीत होता. तिच्यावर विशेष लक्ष ठेवीत होता. तिच्या रूपाचें बेरूप होऊ नये याची काळजी घेत होता.

सगळ गाव शांत होत. आभाळात चांदण्या लुकलुकत होत्या. वाऱ्याच्या झुळुकीनं लिंबाच्या डहाळ्या हलत होत्या. घोरण्याचे आवाज स्पष्ट ऐकूं येत होते. कुठहि दिवा दिसत नव्हता. कुठहि हालचाल नव्हती. घराघरापुढं बांधलेली गुरंसुद्धा निश्चल होतीं, झोपेंत होतीं.

हातातली डहाळे पाडायची कुऱ्हाड टेकीत टेकीत रामा घराकडे येत होता. दिवसभराच्या कामानं शिणवटा येऊन त्याचे डोळे जड झाले होते. मांड्या आणि हाताचे रट्टे ठणकत होते.

पडझड झालेल्या आपल्या घरापाशीं तो आला आणि कुत्रे विव्हळल्याचा आवाज ऐकून जागच्या जागीं उभा राहिला. डोळ्याच्या बाहुल्या मोठ्या करून पडकांत बघूं लागला.

भाद्रपदाचा महिना आणि घरात देखणी कुत्री यामुळं गांवातल्या कुत्र्यांनीं

रामाला जेरीला आणलं होत. दिवसरात्र ती तोंडानी चमत्कारिक आवाज काढीत घराभोवतीं हिंडत. बंदोबस्तात डांबून ठेवलेल्या रामाच्या कुत्रीपायीं जीव टाकत! त्याना धोंपाटण्या घालता घालता, हुसकून लावता लावता रामा जेरीला आला होता. कावून गेला होता. गावची कुत्रीं येत ती येत, पण वाड्यावस्त्यावरचे बहादरहि, जिभा बाहेर काढून, दोन दोन तीन तीन मैलाची मजल मारून रात्री अपरात्रीं रामाच्या घराकडे येत आणि आत जाण्याचा प्रयत्न करत. माळवदा—भिंताडावर चढत. घराशेजारी रामा थांबला आणि पडकात बघू लागला. परगावचा कोण मुशाफीर आपल्या घरात शिरू पहातोय ते बघू लागला आणि त्या फिकट प्रकाशात त्याला तो दिसला. ढासळलेल्या दगडावर चढून भितीवरून उडी घ्यायच्या खटपटींत तो होता. त्याचं टणटणीत अंग आणि ऐटबाज शेपूट रामाला दिसलं आणि तो पेटला. परगावच्या या रंडीबाज गड्याला हिसका दाखविण्यासाटीं त्याचे हात शिवशिवू लागले. हातातील कुऱ्हाड उचलून तो लपत छपत त्याच्या-पाशीं जाऊ लागला.

काळा कुत्रा आपल्याच नादात होता. त्याचं डोकं फिरलं होत. कान उभा-रून शेपटाचा गोंडा हलवीत तो मागं सरके, पुढं सरके, खाली बसे, ‘ कुई कुई ’ करून विव्हळे. त्या उंच भितीच्या आत उडी टाकण्याचा धीर त्याला अजून होत नव्हता.

वहाणाचा आवाज होऊ न देता, खिडारांच्या आडोशानं रामा हळुहळू त्याच्यापाशीं जात होता. फुटाफुटानं अंतर कमी होत होत. श्वास रोखून आणि कुऱ्हाड उचलून रामा पुढं होत होता.

कुत्रा आपल्या नादातच होता. आजुबाजूला त्याचं ध्यानच नव्हत. आपल्या दिशेनं काळ हळुहळू पुढं सरकतो आहे याकडे लक्षच नव्हत. जनावर काय, माणूस काय, एकदा असल्या नादात पडलं कीं त्याला भान रहात नाहीं. त्याच्या हुषारीचा सारा कल त्या एका गोष्टीकडे असतो. आणि मग त्याला कुणीहि लोळवतं, कुणीहि खड्डयात लोटतं.

काळा कुत्रा नादात होता. आणि रामा त्याच्या मागं गेला. गेला आणि जनावर घावाच्या टप्प्यात आहे याचा अदमास येताच लांब दांड्याची ती



कुऱ्हाड त्यानं बुध्याकडून उगारली; कुत्र्याच्या डोस्क्यात अंगच्या बळानं घातली. खटकन् आवाज झाला. व्हॉ करून कुत्रा ओरडला, चपळाईनं उलट फिरला, आणि आपल्याला अचानक दगाफटका करणाऱ्या रामावर बेशक चालून गेला. गुरगुरत नाक फेंदारत झेपावला. खरें तर त्याला अधू करण्यासाठींच

रामान टोला हाणला होता, ठार मारण्यासाठीं नव्हे. पण कुत्रा अंगावर येताच तो विचार गेला आणि रामानं चक्क कुऱ्हाडीचा घाव घातला. त्या जखमेनं कुत्रा भेलकाडला तेव्हां आपल्या जाड वहाणांचा पाय त्याच्या तोंडावर देऊन रामानं त्याच मुडकं तोडलं. धडावेगळं केलं! रामाचा पाय रक्तानं भरला.

कुत्र्याच्या तडफडाटामुळ उडालेला धुरळा चहूबाजूला गेला. धड मातींत निचेष्ट पडलं. झालेल्या गोंधळान, कुत्रीच्या आरोळ्यान जागी झालेली रामाची आई दार उघडून बाहेर आली आणि ओरडली,

"कोण हाय?"

कुऱ्हाडीच ओलं पात मातींत घोळशीत रामा बोलला,

"का ग नाने, मी हाय्."

"पडकात र काय करतोस?"

"कुत्रा मारला परगांवचा."

"जीव घेतलास काय?"

"अंगावर आला तसा तोडला कुऱ्हाडीन!"

"अर चडाळा, ये आत!"

पायावरचं रक्त पुसून रामा आत आला. त्याची देखणी कुत्री बांधल्या जागीं उड्या घेऊ लागली. बारीक ओरडूं लागली. घोंगड्यावर पडता पडतां रामा म्हणाला,

"तें धड ओढ्यात नेवून टाकल पायजे. वास सुटंल!"

"टाक सकाळ. पड आतां!"

सकाळीं मारलेल्या कुत्र्याचं धड ओढ्यांत नेवून टाकलं, तेव्हां चांगलं उजाडल. त्या उजेडात रामाला समजून आलं कीं, अंधारांत चूलभूल झाली. आपण परगांवच समजून तोडला तो कुत्रा बाबू म्हातऱ्याच्या वस्तीवरचा आहे! आणि तो हबकला. साहजिक हबकला. आपला राखणीचा कुत्रा रामानं तोडला हें कळतांच तो महाकाय माणूस काय करील त्याचा नेम नव्हता. मोमिनाच्या

पोराला ठोकला तसा तो रामूला ठोकील किंवा कुऱ्हाडीन मुंडकं तोडून त्याचा जीव घेईल ! संतापी बाबू म्हातऱ्या काय वाटेल तें करील !

म्हातऱ्याच्या मेलेल्या कुत्र्याभोंवतीं पाचसहा पोर गोळा झाली. कुत्र्याचं धड त्यानीं ओळखल. विचार करत उभा असलेल्या रामाला त्यानीं छेडलं,

" रामा, कुत्रा कुणाचा ? "

" बाबू म्हातऱ्याचा ! "

" कुणी तोडला ? "

" मीच ! "

" आ, तो खवीस माणूस तुला ठाव नाही का ? त्याची खोड का काढलीस ? "

" फसगमत झाली. मी मागवा म्हणून म्हातऱ्याचा कुत्रा मारला नाहीं ! "

" मग ? "

" आमच्या कुत्रीला चिवडवायला कुणी परगावचा कुत्रा आला अशा समजुतीनं मी कुऱ्हाड मारली. "

" तुला गावचा कुत्रा ओळखू आला नाही ? "

" अंधारात नीट दिसल नाहीं ! "

पोराना गोष्ट पटली. म्हातऱ्याचा कुत्रा मारण्याचं धाडस एरवीं कुणी केल नसत. खरोखरीच रामाची फसगंमत झाली असली पाहिजे. पण ही गोष्ट म्हातऱ्या मानणार कसा ?

" रामू, तुझी गोष्ट आम्हाला पटली, पर बाबूला पटणार का ? "

" तें मी काय सागूं ? "

" मी सांगतो, त्याला पटणार नाहीं. मोमिनाच्या पोरासारखा तो तुला हाणील ! "

" जसं आपल्या तकदीरांत असंल तसं होईल ! "

अशी बोलाचाली झाली. डोक्यावरून कावळे, घारी उडूं लागल्या तेव्हां पोरं हलली, म्हातऱ्या आता रामूला कच्चा खाल्ल्याशिवाय रहात नाहीं असं

बोलत हलली. रामाहि घराकडे आला. उगीच विचार करत पायरीवर बसला. तोहि ताकदीनं भारी होता, पण त्याच्या हातून गुन्हा घडला होता. म्हातऱ्याचा जोरदार आणि किमतवान कुत्रा त्यानं तोडला होता. म्हातऱ्या बोलेल ते खपवून घेणं भाग होत. कलागत करायची म्हणलं तरी म्हातऱ्या फार भारी माणूस होता.

रामून विचार कर कर केला. सकाळची न्याहरी कशी तरी आटपली आणि धोतरानं तोंड पुसत तो आईला बोलला,

" मी वाइसा मळ्याकडन जाऊन येतो ग म्हातऱ्याच्या ! "

म्हातऱ्याचा आणि आपला काही संबंध नसता पोरगा तिकड का निघाला, त्या अघोरी माणसाशी पोरान काय काम काढलंय् ?—असं वाटून तिन काळजीनं विचारल,

" का र लेकरा, तिकडं काम काय ? "

" अग, रात्ती मारलेला कुत्रा परगावचा नव्हता ! "

" मग ? "

" बाबूचा होता ! "

" अर माज्या कपाळा ! अर मग आपणहून का जातोस त्याला सांगायला ? नको जाऊस बाबा, नको ! मारंल, हाणील तुला ! "

" हाणायला मी काय बळे मारला त्याचा कुत्रा ? "

" नाहीं, चुकून मारलास. पर कुत्रा मेला नव्ह ? तो फिरून येणार नाहीं. बाब्याच्या मनातला हा राग कमी जाईल ? तू जाऊ नकोस ! "

" मग कस करूं ? "

" त्याला येऊ दे विचारायला माझ्या घरीं. मग बघन माज मी. तू जाऊ नकोस ! "

" रानात तरी जाऊ का नको ? "

" न जाऊन कस भागेल ? माजीं ढोर उपाशी राहतील ! "

मग रामानं गुरढोर सोडली. ती चारण्यासाठी तो रानामाळात गेला. त्याची देखणी कुत्री त्याच्या मागोमाग शेपूट हलवीत गेली.

बांधाबांधावरचं हिरवं गवत खात गुरं हिंडू लागलीं. जांभळीच्या झुडपाला शेरडं झटू लागली. दिवस बराच वर आला. वडाच्या सावलीला रामा बसला. त्याची कुत्रीहि त्याच्या जवळ बसली.

अद्याप त्याच्या पोटातील धाकधुक कमी झाली नव्हती. स्वभावानं तितकासा कडक नसलेला, कष्टाळू, एकाडा रामा हातून झालेल्या अपराधानं ग्याला होता. कुत्रा मारल्याची बातमी समजल्यावर तो माथेफिरू इसम काय करील याचा अदाज बांधता बांधता जास्तीच ग्याला होता.

हिरवगार रान, ओलसर वारा, गळयातल्या घंटा हालवीत चरणारीं गुरं, पांढऱ्या ढगानीं भरलेल आभाळ, पाखराचा चिवाचिवाट आणि व्हल्यानीं घातलेले हुंकार असल्या वातावरणात देखील त्याला त्या भीतीचा विसर पडला नाहीं. आजूबाजूला कुणी नव्हत. मुद्दाम आज वेगळा भाग रामानं निवडला होता. त्याला दिवस गावापासून लांब काढायचा होता आणि रात्री घरीं जाताच आईनं म्हातऱ्याची समजूत कशी घातली हें ऐकायच होतं.

आणि आपली गुरं घेऊन बाबू म्हातऱ्या त्याच रानात आला ! रामूच्या समोर आला. अंगात फाटलेला गोल अंगरखा घातलेला, जबरदस्त म्हातऱ्या बैलाना आसूड उडवीत त्याच रानात आला. रामाच्या काळजात धसका बसला. क्षणभर तो थंडगार झाला.

हळुहळू चालत म्हातऱ्या त्याच झाडाखालीं आला; ज्या झाडाखाली रामा बसला होता त्याच.

रामा चमकला आणि बावरून उठला, उभा राहिला. म्हातऱ्या अंगावर यायच्या आत पळून जाण्याची तयारी त्यानं केली.

डाव्या उजव्या पायावर सारखा भार देत म्हातऱ्या आला. त्याचा चेहरा उन्हानं कोळपला होता. घामानं चिकचिकला होता. एका हातात आसूड घेऊन तो झाडाखालीं आला तेव्हां रामाचा घसा एकाएकीं कोरडा झाला. त्याच्या-बरोबर कुत्रीहि उभी राहिली होती. ती कान उंचावून म्हातऱ्याकडे बघू लागली.

देवीला सोडलेला रेडा जसा येतो तसा म्हातऱ्या आला. धीरानं, खबीर-पणानं, कुणाचीहि, कशाचीहि तमा न करतां. आणि रामापुढं पुरा उभा राहिला. पावलांत तीन फुटाचं अंतर ठेवून आणि दोन्ही हात सैल सोडून रामाच्या तोंडाकडे बघूं लागला.

कोरडया तोंडात जीभ फिरवीत, भित्रे डोळे खाली करीत रामा बोलला,

"बाबूराव—तुमचं..."

पण त्याला बोलणं सुधारेना. जागच्या जागी तो चुळबुळू लागला. तो एव-ढासा पोर भेदरून गेला.

बोबडया पण खंबीर आवाजानं म्हातऱ्यानं चौकशी केली,

"नारायण पाटलाचा पोरंच नव्हं का तूं?"

रामान मान हलवली.

"रामा नव्ह तुझं नाव? हा, मी गावात फार करून येत नाहीं. नवी पोरं मला ओळखत नाहीत!"

त्याच्या त्या बोलण्यावरून रामाला थोडका धीर आला. संशय निर्माण झाला कीं, कुत्रा मारल्याची बातमी याला कळली का नाहीं? कळली असती तर हा असा बोलताच ना. निमूटपणें येऊन हाडं मऊ करता. मग? ही काय भानगड आहे?

झाडाच्या बुध्याशी येऊन म्हातऱ्या खाली बसला. मांडी घालून बसला, आणि चोरासारखा उभा राहिलेल्या रामाला म्हणाला,

"हे पिल्लू तुझंच का?"

रामान होकार दिला. त्याची खात्री पटत चालली कीं, कुत्रा मारल्याची हकिगत अद्याप या गड्याच्या कानावर आली नाहीं.

रामाच्या पायाशी उभीं राहून कुत्री म्हातऱ्याकडे बघत होती. तो फासे-पारधी किंवा काशीकापड्या आहे अशा तऱ्हेनं बघत होती. वरचेवर मान खाली करत होती. शेपूट हलवीत होती.

"चागलं हाय रं पिल्लू!" असं म्हणून म्हातऱ्या चुटक्या वाजवूं लागला. तोंडानं आवाज करून रामाच्या देखण्या कुत्रीला बोलावूं लागला.

रामाला आश्चीत वाटलं. म्हातऱ्याच्या या माणसासारख्या वागणुकीचं त्याला नवल नवल वाटलं, आणि मग त्याला धीर आला. आपल्या हातून झालेल्या चुकीची कबूली देण्यासाठीं त्यानं तोंड उघडलं—

" बाबूराव तुम—"

पण म्हातऱ्या मधेच म्हणाला,

" कुठनं पैदा केलंस हे पिल्लू पोरा ? "

आणि पुन्हा चुटक्या वाजवूं लागला.

कुत्री शेपटाचा गोंडा घोळवू लागली.

म्हातऱ्या म्हणाला,

" ये ये, चुक् चुक् चुक्—ये ! "

मग कुत्री मान वाकवून पुढं झाली. चारी पायावर दबून चालत पुढ झाली. म्हातऱ्यापुढं जाऊन उभी राहिली.

म्हातऱ्यान रामाला विचारल,

" चावरी हाय् का र, आ ? "

" नाही नाहीं, लावा कीं हात बेशक ! "

मग बाबून हात लाबडा केला आणि शेरडाच्या पिलाला ओढाव तसं त्या कुत्रीला कान धरून जवळ ओढल.

रामाची कुत्री चागल्या जातीची होती. तो म्हणे कीं ती इराणी आहे ! गावठी कुत्र्यापेक्षा हे जनावर जादा लाब होत. त्याचं तोंडहि निमुळत आणि लाब, रग पाढरा स्वच्छ आणि कुठ कुठ पिवळसर ताबडे ठिपके, बेताबाताचे केस आणि लाब मानेखाली लोंबणारे कान. गावात तसल कुत्रं नव्हत. धुळे-मोर्चापूरहून रामानं तें पिलूं आणलं होत आणि आता वयात येऊनहि शाबूद, कोरं राखल होतं !

कुत्रीची केसाळ आणि लाबलचक शेपटी म्हातऱ्यान पकडली. हाताला तिचा एक तिढा घेतला. तशी कुत्री ओरडू लागली, धडपडू लागली.

ती धडपड रामाला बघवेना. आणि म्हातऱ्याला कमीजास्त बोलण्याचा धीरहि होईना.

कुत्री खाली पडली. उलटी झाली आणि तोंड वर करून लाथा झाडत केविलवाणी केकाटू लागली. तरी म्हातऱ्यान ओढून धरलेलं शेपूट सोडल नाहीं.

कुत्रीच्या जलद धडपडीन खालचा धुरळा उडू लागला.

रामाचं काळीज कळवळलं. आपल्या हातून झालेली चुकी सागून टाकण्या-साठीं तो म्हणाला,

" त्याचं अशी गोष्ट झाली बाबूरा-"

कुत्र्याची ती धडपड बघून म्हातऱ्या मोटमोठ्यान हसला. त्याच्या तोंडाच्या कोपऱ्याशीं थुकी जमली. तो ओरडून म्हणाला,

" जनावर चागलं ताकदवान आणि चलाख बाळगल आहेस रे नाऱ्या पाटलाच्या पोरा !"

आता कुत्री जास्तच केविलवाणी ओरडू लागली. तिच्या शेपटाला फार रग लागली होती.

रामा चार पावल पुढ झाला आणि वाकून म्हणाला,

" नका नका, बाबूराव, मुक्या जनावराला अस-"

म्हातऱ्यान आपला दणकट हात कुत्रीच्या मानगुटावर दिला. वेदून घोरपड धरावी तशी त्यान ती दाडगी कुत्री दोन्ही हाताच्या पंजान धरली. जाम जमिनीशीं चेपली. कुत्रीची ती दशा रामाला असह्य झाली. हात पुढ करून तो म्हणाला,

" नका नका—"

त्यासरशीं म्हातऱ्या चवताळला. गरजला,

" माजा कुत्रा कुऱ्हाडीन तोडलास साल्या, तुझी कणव त्या येळीं कुटं गेली होती, हा ? "

आणि मग बसल्या बसल्याच त्यान कुत्रीच शेपूट धरून तिला वर उच-लली. धुण्याचा पिळा सपकवा तशी भुईवर सपकली.

धुरळा उडाला.

कुत्री भयंकर ओरडली. त्या आपटण्यानं तिचीं हाडं चिबली, कडाकड वाजलीं.

रामा भयंकर भ्याला! दातावर दात घट्ट मिटून लटलट कापत उभा राहिला.

पुन्हा म्हातऱ्यानं कुत्री उचलली आणि धापकन् खोडावर आपटली! जनावराचा चेंदामेंदा झाला!

दोन चार वेळ म्हातऱ्यानं रामाची कुत्री अशी आपटली. दाणा निघण्या-साठीं पेंडी झोडावी तशी झोडली आणि रानात भिर्कावली!

दोन्ही हात पुढं करून रामा उभा होता. भीतीनं त्याचा चेहरा काळानिळा झाला.

आणि मग म्हातऱ्या एकदम जागचा उठला. म्हणाला,

"थूत् तुज्या नाऱ्या पाटलाच्या पोराच्या हो!"

त्यासरशीं रामा घाबरून भयंकर ओरडला. अपरात्रीं भूत दिसल्यावर किंचाळावं तसा किंचाळला. आणि पाठ फिरवून धूम पळाला. त्या मोकळ्या रानातून धोतर सावरून धूम् गावाकडे पळाला.

रानात चरणारीं त्याचीं गुरं खाणं सोडून त्याच्याकडे बघूं लागलीं. कान उभारून आणि जबडे थांबवून आश्चर्यानं बघूं लागली.

# विलायती कोंबडीं

सकाळीं न्याहऱ्या करून लोक रानामाळाकडे निघाले तेव्हा पाटील आपल्या पडक्या वाड्यापुढील मोकळ्या आवारात कोंबड्याना दाणे घालताना दिसला. कोवळ्या उन्हाला तो बसला होता. मुठी भरभरून दाणे उधळीत होता. दोन विलायती कोंबडीं ते टिपीत होतीं.

घरकामात चुकूनहि ध्यान न देणारा हा पाटील आज कोंबडी चारीत का आणि कसा बसला या विचारानं गांवकरी मंडळींना बहुत अचबा वाटला. हातात दोरखंड, विळे घेतलेली दहा पाच मंडळी भोंवतीं गोळा झाली आणि हा देखावा बघत उभी राहिली.

पाटील दोन पायावर बसला होता आणि गोल अंगरख्याच्या खिशातून पाढरे शुभ्र जोंधळे काढून कोंबड्यापुढ उधळीत होता. मातेर किंवा किडक धान्य सोडून हा खुळा माणूस उत्तम प्रतीचे जोंधळे का फुकट घालवतो आहे हे मंडळीना उमगेना. पाटलाच्या या अजब करणीकडे बघून त्याना काहींच बोध होईना !

हां, ही गोष्ट खरी कीं, दाणे टिपणारा पाटलाचा कोंबडा आणि कोंबडी नवीं दिसत होतीं. गावातल्या मोठ्यात मोठ्या कोंबड्यापेक्षा मोठीं आणि देखणीं होती. बड्या कोंबडा डोईवरचा टिचभर तुरा हालवीत दाणा टोचत होता. आपल्या पिवळ्या धम्मक आणि कणखर पायांनीं धुरोळा उडवीत होता. रगानं पांढरा शुभ्र असलेल्या या नराचा थाट थेट एखाद्या पोलिस अम्मलदारासारखा होता ! मधेच खाण थाबवून तो आपली गुबगुबीत मान वर करी. हनुवटीशीं लोंबणाऱ्या ताबड्या लोळया हलवीत भोंवतीं जमलेल्या लोकाकडे बघे आणि पुन्हा दाणे टिपी !



तशीच कोंबडी ! स्वरूपानं देखणी, पण सुखावल्यामुळं अंगानं सुटलेल्या अम्मलदाराच्या बायकोसारखी. नवऱ्याच्या अंगचटीला न येता पोक्तपणे तीहि दाणे टिपीत होती. मान बाहेर काढीत होती, आंत घेत होती. डौलात चालत होती.

पाखरं देखणी होतीं ही गोष्ट खरी. पण म्हणून काय प्रत्यक्ष पाटलानं दाणे टाकीत बसावं ? विलायती म्हणून त्यांना काय बेण्याजोगे जोंधळे टाकावे ? तसं बघावं तर इतकीं माणसं बघायला आलीं याचं कौतुकहि पाटलाच्या तोंडावर नव्हतं. सरकारी ऑफिसरशीं वागल्यासारखा त्या पाखरांशीं तो अति अदबीनं वागत होता. मग ही भानगड काय असावी ?

राणूचा म्हादा खाकरून डाव्या बाजूस थुंकला आणि हलकेच म्हणाला.

“ इलायती बेणं आणलं काय पाटील ? ”

डोळा वर करून पाटील म्हणाला,

“ काय म्हणालास ? ”

" वेण इलायती आणलं काय ? "

" हां हा ! "

एवढाच होकार देऊन पाटील पुन्हा पाखराकडे बघू लागला.

बोकडं चारण्यासाठीं रानात निघालेला मुसलमानाचा पोरगा बराच वेळ मनात घोळत असलेली गोष्ट बोलला,

" महादा, चार शेर मटण पडल का या कोंबड्याच ?"

हात पाठीमागं टाकून उभा राहिलेल्या सोपानानं उत्तर दिल,

" आगवू पडल ! राव, आपल गावठी कोंबडं चार पाच घातल तरी ह्याची बरोबरी येणार म्हणता का ? ह्या ! " मग मंडळी आपसात चर्चा करू लागली.

" बाईली, कुण्या देशाची ही जात बरं ? व्हय सोपाना ? "

" इलायती नव्ह म्हणतो मी. जपानी जात असावी. "

" ते काय हाय रे मुसलमाना ? "

" मुलुख हाय. तिकडची असावी ही जात ! "

" तुला कस वळखल ? "

" मुंबईला असताना मी आमच्या सायबान बाळगल्याली बघितलीया ना ! "

दाणे टिपता टिपताच कोंबड्याला हुक्की आली. कोंबडीच्या भोंवतीं तो फेऱ्या मारू लागला. पख उभारून फिरू लागला. उभारल्या पखात नख्या अडकून मेलकाडू लागला ! ती पळू लागली तसा मान खाली घालून पाठलाग करू लागला. कोंबडी टो टो ओरडूं लागली. आवारभर त्याचा गोंधळ सुरू झाला !

पाटील विडी ओढीत सर्व प्रकार बघत होता.

मग सोपानानं प्रश्न केला,

" जोडीला काय पडलं ह्या पाटील ? "

" कोंबडी माझी नव्हत ती सोपाना ! "

" मग ? नवीन दिसली तवा म्हणलं तुमीच आणली काय ! "

" नव्हं ! "

" पाव्हण्यान आणून सोडली ? "

" नव्हं. सरकारी जोडी हाय ही ! "

" सरकारी ? "

" हा, आपल्या गावासाटी सरकारन धाडली ! "

सर्वांना अचबा वाटला. गुन्हा झाला तर सरकार सजा देत. कामाबद्दल पाटीलकुलकर्ण्यांना पगार देत. खड भरला नाहीं तर दम देत. पण कोंबड्या ? गावाला कोंबड्या देणारं सरकार कसल हें ? विचार करण्यासारखी गोष्ट आहे !

महादा म्हणाला,

" कामाधामासाठीं अम्मलदार येतात. त्याना जेवण कराव लागत. जेवणात गांवठी कोंबडी त्याना चालत नाहीं. म्हणून या कोंबड्या सरकारनं धाडल्या ! "

पण पाटील त्याच्यावर ठिसकला,

" ये अडाण्या, अम्मलदाराना खाण्यापायीं दिल्या होय र कोंबड्या सरकारन ? "

" तर कशापायीं ? "

पाटलागांत कोंबडी हरली होती. तिच्या डोईवरचा बुटका तुरा कोंबड्याच्या टोचीन लालभडक झाला होता. तरीहि आता ती त्याच्या जवळून चालत होती. मग कोंबडा थाबला. डावा पाय आखडून त्यान छाती काढली आणि कडक साद ठेवून दिली !

ती साद ऐकून शेजारचा सोनार बाहेर आला आणि जमलेल्या मंडळींत येऊन उभा राहिला. विलायती कोंबड्याकडे बघून विचारूं लागला,

" ह्यानंच साद दिली का ? "

सोनार म्हातारा होता. त्याच्या तोंडातले सगळे दात पडले होते. कानातले, आणि छातीवरचे केस पिकून पांढरे झाले होते. मंडळीकडून होकार आला तेव्हां हातातला चिमटा वर करून तो बोलला,

" आज इतकीं वर्स कोंबड्याची बांग ऐकतोय्. भल्या पहाटे घातलेली पहिली बांग ऐकतोय्. पण आज पहाट ऐकली अशी कडक साद आपण कधींच ऐकली नव्हती ! "

पाटील अभिमानानं म्हणाला,

"आज पहातं ना? मग ती बाग आमच्या ह्या सरकारी कोंबड्याचीच!"

सोनार खूप झाला. म्हणाला,

"सरकारी म्हणाल्यावर मग बोलणच खुटल! शंभर रुपये खर्ची घालून ही जोडी त्यांनीं आणवली असंल!"

"हां." पाटलानं खुलासा केला, "सरकार आता खेड्याची सुधारणा करणार आहे. ही कोंबड्याची जोडी आपण नीट जतन करायची आणि बरोबर सात वर्षांनीं ह्याची सख्या इतकी वाढली पायजे कीं ह्या जातीशिवाय दुसरी जात गावात दिसली ना पाहिजे!"

सर्वांनीं ही महत्त्वाची गोष्ट ध्यानी घेतली. घडीभर विचार केला.

महादा बोलला,

"म्हजे हे बेणं धाडलय म्हणा कीं सरकारान, पाटील!"

"तर काय?"

"मग हाय! पर कोंबड्याची जात काकळ. रोगान मेलीबेली म्हजे मग आली का पिडा! सरकार भरुन धील की गावाकडनं?"

महादाची ही शंका बरोबर होती. पाटीलहि घडीभर बुचकळ्यात पडला. ही भानगड त्याच्या ध्यानातच आली नव्हती. अखेर विचारपूर्वक त्यानं उत्तर दिल,

"इलायती कोंबड्यास रोग होत नाही, महादा. आणि जरी झाला तरी सरकारकडून औषधाची पेटी आलीय् माझ्याकडे तें दिल कीं घडीभरात गूण!"

"बरं का पाटील, आमच्या कोंबड्या आजारल्या तर तुमाकडं याव!"

"छ्या! अरे येड्या, तीं औषधं इलायती. आपल्या गावठी कोंबड्याना चालणार नाहींत!"

पाटलानं अशी चळक दिली आणि मग मडळी फुटली. सरकारी कोंबड्या-विषयीं बोलत, चर्चा करत रानामाळात गेली.

आठ बारा रोज गेले.

आणि अचानक मामलेदाराचा टांगा गावीं आला. दप्तर तपासण्यासाठीं आला. पाटील घाबरून गड्डगोळा झाला.

मारुतीच्या देवळात जाजम, तक्क्या, लोड ही बैठक अंथरली गेली. पट्टेवाल्यानं पाटलाला दम देऊन पाणी आणवलं. हातपाय धुवून मामलेदार हुषार झाला आणि त्यानं दप्तरं हजर करण्यासाठीं फर्मावलं. तीं आली तसा कागदपत्रांत डोकं घालून तो चुका शोधूं लागला. पाटील आणि कुलकर्णी चोरागत जाजमाच्या कडेशीं बसून राहिले. गावातली काहीं प्रतिष्ठित मंडळीहि कोट टोपी घालून उगाचच खांब धरून बसली. समोरच्या पटांगणात महार-रामोशी धुरोळ्यावर रेघा काढूं लागले. इतकी मंडळी होती तरी गवगव बिलकुल नव्हती. जो तो चापचूप होता. काहीं बोलायचं झाल्यच तर दूर जाऊन बोलत होता. आणि मामलेदार आपल्या टपोऱ्या नाकावर चाळशी ठेवून कागदपत्र तपाशीत होता.

देवळाच्या भिंतीशीं पट्टेवाला खांबासारखा उभा होता. खुंटीवर साहेबाचा निळ्या रंगाचा लोकरी कोट लोंबत होता. कोपऱ्याला चामडी पट्ट्यानीं आवळलेली वळकटी, जेवणाचा डबा, कडीचा तांब्या, छत्री आणि एक लहान चामडी बॅग हें प्रवासी सामान होतं, त्याच्याकडे तो उगीच बघत होता.

मग एकाएकीं सुरुंग उडावा तसा मामलेदार ओरडला, "गाढव लोक! कामं करता का हजामती? बेशरम, पाजी! फुकट सरकारचा पगार खाता! तुमच्या बापानीं हें आता निस्तरायचं का?"

पाटील-कुळकर्ण्यांचे चेहरे पडले. दोन्ही हात एकमेकांवर घट्ट धरून त्यांनीं अंगाचा संकोच केला. जणूं कांही मामलेदार त्याना ठोकणार होता.

आजूबाजूची मंडळी हादरली आणि सांवरून बसली. कदाचित् आपण उगीच का बसलोंय् म्हणून मामलेदार विचारील या शंकेनं भयभीत झाली. उठून जाण्यासाठी चुळबुळूं लागली. पण तेंहि आता कठीण होतं.

मामलेदाराचा बोक्यासारखा चेहरा रागानं तांबडालाल झाला. त्याच्या तोंडातून नीट शब्द फुटेनात.

"काय रे ए कुलकर्णी, आ? कशाला करतां नोकऱ्या? हजामाचीं दुकानं काढा! होय रे पाटला, आ? गुंडगिरी करून पैसे खातोस, लोकाना लुबाडतोस?"

पाटील हात जोडून म्हणाला,

" सभाळून घ्या साहेब. "

" काय संभाळूं रे, आ ? शरम नाहीं वाटत चुका करायला ? काय रे कुलकर्ण्या, दोघांनीं संगनमत करून किती लाच खाल्ली ? किती वसूल घशांत घातला ? आ ? "

मकेच्या लाह्या उडाव्या तसा साहेब बोलला. घामाघूम झाला. पाटलाची हबेलंडी उडाली. कुलकर्णी मात्र वरून घाबरल्यासारखा दाखवत होता आणि मनाशीं म्हणत होता, तुझ्यासारखे पाच मामलेदार गेले राया आजपर्यंत! बोल! बोललास म्हणून भोक पडत नाहींत माझ्या अंगाला !

जेवणवेळ टळेपर्यंत मामलेदार असं बोलला, त्यान लाख चुका काढल्या आणि मग तो जेवणासाठीं उठला. डबा उघडून जेवला आणि गारव्याला झोपला.

भुकेन वखवखलेल्या पाटलाला एका बाजूला घेऊन पट्टेवाला त्याच्या कानात कुजबुजला,

" रात्रीं जेवणाचा बेत करा झकास म्हणजे येईल काम ताळ्यावर ! "

" बरं ! गोडं का खारं करू ? "

" गोड कशाला ? मुर्गी धस्काटा कीं एखादी ! "

" ठीक ! "

पाटील घरीं आला आणि पाटलिणीला म्हणाला,

" सायबाचा मुक्काम हाय रात्री. खार जेवण कर झकास ! "

पाटलिणीनं झकास जेवण केलं. पट्टेवाल्यानं डबा भरून नेला. साहेब टम्म फुगला आणि मऊ आला. सकाळीं चागला शेरा देऊन जायला निघाला. पाटलाला म्हणाला,

" जेवण उत्तम करता पाटील तुम्ही ! असल्या चवदार कोंबड्या तुमच्याकडे आहेत हें माहित नव्हतं आम्हाला ! "

पाटील कसनुसं हसला. म्हणाला,

" पाहिजे तर, जाताना दोन घेऊन जा साहेब बरोबर ! "

यावर साहेब काही बोलला नाहीं. पण पट्टेवाल्यानं पाटलाचा पिच्छा घेतला.

पाटील घरीं गेला आणि पाटलिणीला म्हणाला,

" सायबाला कोंबडी फार पसंत पडली. जाताना त्यानं दोन कोंबड्या मागितल्यात. म्हणाला, तुमच्या कोंबड्या इतक्या चवदार आहेत हे आम्हाला ठाऊक नव्हतं ! "

पाटील असं बोलताच पाटलीण म्हणाली,

" बरा सोकावलास म्हणावं सायबाला ! कोंबड्या मागतोय् ! आमच्या कोंबड्या न्हाईत चांगल्या, तुज्याच ग्वा म्हणावं ! "

" असं कसं ग म्हणावं ? "

" तर काय करता ? रोज तुमचा सायेब ईल आन् कोंबडी मागल. माज्या खुराड्यात कोंबडी ऱ्हाईल का अशानं ? आज केलेली कोंबडी आपली नव्हती ! "

" मग ग ? "

" सरकारी कोंबडीच घातली सायबाला ! "

" खरं म्हणतीस ? "

" हां हा, खोटं कशाला बोलू ? "

पाटील मटकन् खाली बसला. म्हणाला,

" अरं माझ्या देवा ! आता तू मला फासावर चढवतीस ! "

बाहेर उभ्या राहिलेल्या पट्टेवाल्यानं हा गोंधळ ऐकला आणि थेट तो साहेबाकडे आला. घडलेला सर्व बनाव त्यानं त्याला ऐकवला !

टांगा जोडून साहेब निघाला तेव्हा बायकोच्या गाढवपणामुळं खचलेला पाटील त्याला घालवण्यासाठी टांग्यापाठोपाठ गावाबाहेर गेला. खाली मान घालून कुत्र्यासारखा टांग्याबरोबर चालूं लागला.

साहेबानं विचारलं,

" पाटील, कोंबड्या दिल्या का ? "

पाटील कसनुसं हसला. लाचारीनं म्हणाला,

" तसल्या कोंबड्या नाहींत साहेब आतां ! "

" तसल्या म्हणजे कसल्या ? "

" विलायती, साहेब ! "

" वाः ! विलायती कोंबड्या पाळून आहेस का तू ? "

" मी नाहीं साहेब, त्या कोंबड्या—"

" बोल बोल, गप् का ? "

" नाहीं साहेब, पण—"

" बोल बोल—"

" सभाळून घ्या साहेब. बायकोन चूक केली. माझ्या माघारीं साहेब, सरकारी कोंबड्या कापून जेवण केल आपल ! "

" गाढव, बेशरम—"

साहेब लाह्या उडाव्यात तसा बोलला. पाटलानं टांग्यातल्या साहेबाला साष्टांग नमस्कार घालून विनवणी केली.

" सभाळून घ्या, साहेब—"

" काय सभाळू र, आ ? आता कलेक्टर मला सोलून खाईल त्याला काय करूं ? "

" माझी चूक नाही साहेब. बायकोन कावा केला. मला माहित नव्हत— सभाळून घ्या एकवार ! "

" बान्चोद ! वर बोलतोस आणखी ? तुझ्या बायकोला अक्कल नाहीं याचा त्रास मला का ? आ ? "

टांगा पुढं आणि पाटील माग. साहेब शिव्या देई आणि पाटील पायां पडे. असा प्रकार मैलभर चालला. शेवटीं साहेब म्हणाला,

" जा जा, आता माघारी. अर्ज कर माझ्याकडे कोंबडी रोगान मेली म्हणून. मी सोग देतो—जा. गाढव, बेशरम ! "

# न्याय

चांदणी उगवली. गारवा आवळूं लागला. मारुतीच्या देवळात खालीवर घोंगड घेऊन झोपलेला सता जागा झाला. देवळात अद्याप अंधार होता. रात्रीं गप्पा हाणता हाणता बरीच रात्र झाल्यावर तिथंच मुरगळलेली आणखी चार-चौघ उठून गेलीं होतीं कीं अद्याप झोंपलेलींच होतीं हे कळायला मार्ग नव्हता.

अंधारातच बचकण मारून त्यानं उशाशीं घेतलेलं मुंडास उचललं. कोपऱ्या-नजीकच्या कोनाड्यात ठेवलेल्या वहाणा घेतल्या. घोंगड्याचा गळाठा सावरीत, ऱ्हाकरीत, खोकरीत तो पायऱ्या उतरला आणि रानाकडे चालूं लागला. घोंग-ड्याची खोळ पांघरून, तोंडांत तमाखू धरून.

काळ्या रानातून जाणारी पाऊलवाट संपून त्याचं रान आलं तेव्हां दिशा उजळल्या होत्या. रानचिमण्या अंगावरची पिसं पिवळ्या चोंचीनं उकरीत होत्या. कुरकुरू बोलत होत्या. जोंधळ्याची ताटं धुकं पांघरून उभीं होतीं. त्याच्या डोक्यावरचीं कणसं गारठून आकसलीं होतीं.

बांधाबांधानं तो चालूं लागला. सगळ्या शिवारचा त्याला कडवेढा आणा-यचा होता. रातोरात कुणीं ताटुकं नेलंय का काय ते बघायचं होतं.

पलीकडच्या बाभळीवरून लांड्याचा एक छोटासा थवा भिरकन् आला आणि कणसावर बसला. त्यासरसा सता झटक्यानं खालीं वाकला. हाताला आलेला धोंडा उचलून घेऊन त्याच्यावर भिरकावून ओरडला, "हा—हा—हैय—लांड्या, लांड्या, लांड्या, हा—"

शेजारच्या ताटावर धप्‌कन धोंडा पडताच लांड्या उडाल्या आणि पसार झाल्या.

आणि एकाएकीं त्याच्या ध्यानात आलं. तो पुढं झाला आणि नीट बघूं लागला. त्याची खात्री पटली. तो चिडला. आणि कुणाला तरी उद्देशून त्यानं फडाफड चार ओंगळवाण्या शिव्या घातल्या.

पिकाचा एक टोबळाच्या टोबळा जनावरांनी खाल्ला होता. तुडवला होता. नासाडी केली होती.

पिवळ्या-पिवळ्या उन्हाच्या प्रकाशात खाली वाकून त्यानं रान तपासलं तेव्हा जनावरांच्या पायाचे खूर दिसले. ते पाहून तो त्रासला, आणि पुन्हा त्यानं शिव्या घातल्या, नाव माहित नसलेल्या त्या दुसमाला ! मुद्दाम, खोडसाळ-पणानं कुणीतरी रात्री बैलं चारली होती. सता लेंगऱ्याचं सात-आठ पायलीचं नुकसान केलं होतं. मग त्यानं का चिडू नये ? का शिव्या घालू नयेत ? स्वतःचीं बैलं जोगावण्यासाठीं, हिरवी वैरण खाऊन तृप्त होण्यासाठी रात्री-अपरात्रीं एकाद्याच्या भरल्या पिकात सोडणं ही गोष्ट का चागली ? सता कुणाच्या अध्यात ना मध्यात. हाडाचीं काडं करून, रक्ताचं पाणी करून त्यानं पिकविलेलं धन असं चोरामोरी का जावं ? जोंधळा दृष्टीस पडत नाहीं, कडब्याचा भाव सोन्याइतका चढलेला अशा स्थितीत सात-आठ पायलीचं नुकसान झाल्यावर मालकाला काय वाटेल? चागला भरण्याचा शेतकरी असता तर सताला त्याचं काहीं वाईट वाटलंहि नसतं ! पाखरांनी खाऊन नाहीं का नुकसान होत ? पण तस नव्हतं. त्याच्या जमिनीचा एवढा-एवढासा तुकडा. त्यात राब राब राबावं तेव्हां कुठं सालभर पुरतील एवढे जोंधळे होणार. घरात खाणारीं तोंड दहा. शिवाय तेल आहे, मीठ आहे, मिरची आहे, त्यासाठीं शेरमापटं जोंधळं वाण्याघरीं जात राहणारच. ते या सालाचे त्या सालाला पुरेपर्यंत मारामार. मग ? आज गप्प बसलो तर उद्या सगळं पीक उभं कापून नेतील रातींतून. मग काय खावं ? कशावर जगावं ? माती खावी ? का वाऱ्याकडे तोंड करून जगावं ? का त्रिबे घालावेत पोटावर ? का काटे भरावेत ? काय करावं काय ? का म्हणून माझं नुकसान ? का म्हणून माझ्याच रानात ही धाड ? का ?...

त्या रागाच्या सपाट्यात, त्या तिरीमिरींत, सता पाखरं राखण्यासाठीं थांबला नाहीं. थेट गावात आला. वाटेनं पुटपुटत आणि बडबडत, हातवारे करीत, थेट गावात आला.

महारवाड्यावरून जाताना अकण्या महार भेटला. दोन्ही हात खाकेत दाबून तो उन्हांत उभा होता. रात्रभर थंडींत थिजलेलं अंगातलं मांस ऊन करीत होता. सताला बघताच तो म्हणाला, "ज्वाऽऽर."

त्यासरशी सता त्याच्यावर उसळला, "काय ज्याऽऽर? लेको, तुमी माजलांत. तुमाला कुनाची जरब वाटंनाशी झाली. दिवसाढवळ्या चोऱ्या करायला लागला र तुमी! अर, पोटाला न्हाई तर मागून घ्यावं. पन चोऱ्या का? कशापायीं? मागितल्यावर कोन न्हाई म्हनतया? का तुमाला शेर-आडशेरी दिलं म्हनून आमची दौलत जातीया, व्हय? आ?"

या अचानक भडिमारानं आकण्या गोंधळला.

"अवं पन, का झालं जी? कुनी केली चोरी?"

"तुला कुठलं ठावं असतय्?...आन असल तरी तूं कुठला सागायला! बराय्, मर्दानूं, नका सागूं. पन ध्येनात धरा, कधातरी बाह्यार पडलच."

या गोंधळानं आणखी चार-दोन महार उठून आली आणि "काय? काय?" म्हणून पुसू लागली. पण सता थांबला न्हाई. पुढंच झाला. आणि रामोशवाड्यापाशीं येऊन त्यान हळी ठोकली, "अर, नाईक कोन हाय का ठिकान्यावर?"

नामज्या नाईक आपल्या घरापुढल्या अंगणात दोपायावर बसला होता. त्याच्या तळहातात एक भाकरी आणि हरबऱ्याची भाजी होती. तोंडात घास होता. हळी ऐकताच तो त्यानं गट्कन् गिळला, आणि भाकरी तशीच हातात घेऊन उभा राहात तो ओरडला, "मी नामज्या हाय जी."

आणि तसाच बाहेर आला. त्याला बघताच सता म्हणाला, "भाकरी खात हुतास का?"

"व्हय जी!"

"खा. आन पानी पिऊन ये. तोपतूर मी हाय हत."

"न्हाई." नामज्या खोटंच बोलला, "झालीया खाऊन भाजी. पानी पिऊन आलोंच."

आणि माघारा पळाला. भाकरी ठेवून आणि पाणी पिऊन आला. धोतराला हात पुशीत म्हणाला, "बोला, काय हुकूम हाय?"

"माज समद पीक कुणी बेलाला चारलय्. तुमी काय गाजरं खात बसतां का?"

सताची दटावणी खरी होती. कारण गांवात चोरीदरवडा झाला तर त्याची जबाबदारी रखवालदार रामोश्यावर असते. गावची राखण त्याच्या शिरावर असते.

"खर म्हनता का? कितीसं खाल्लया?"

"चल, तुज्या नजरंनंच बघ, आन मला पत्त्या लावून दे. न्हाईतर तू दे समदं नुकसान भरून!"

नामज्या आणि सता, एकापाटोपाठ एक असे रानात गेल. बाधावर उभ राहून खाल्लेल्या पिकाकडे हात फेकून सता म्हणाला, "बघ, काय थोडा अजोर हाय ह्यो?"

नामज्या पुट झाला. बारकाव्यानं त्यानं जमीन न्याहाळली. चिघळलेलीं चिपाडं बघितलीं. आणि मग तो बोलला, "बैल न्हाईती बर का. कालवडीच काम हाय हे. ल्हान खूर दिसत्यात न्हवं? आन कनसंबी ताट मोडून मगच खाल्ल्यात!"

आणि आपलं म्हणणं सताला कितपत पटल हे पाहाण्यासाठी त्यान त्याच्या तोंडाकडे नजर लावली.

सता म्हणाला, "एक कालवडच्च हाय?"

"व्हय, व्हय, एकाच कालवडीच काम हाय. गडी मातूर रानात म्हंजे पिकात शिरलेला न्हाई. पायतनाच्या खुणा काय आत नाहींत. भायेर उभं राहून त्यान कालवड चारलीय्!"

"अर, मग गावात कालवडी हैत्या कैक. अमकीच्च म्हणून पत्ता लागावा कसा?"

नामज्याचा चेहरा विचारी झाला होता. तो म्हणाला, "त्याची का काळजी तुमाला? साजपतूर मी नाव सागतो कुणी कालवड चारली ते."

"ठीक. बघूं तुझ कसब. मग पुढचं माज्याकडं लागल."

"बघा."

सता पिकाच्या उसाभरीस लागला. आणि नामज्या कालवडीचे खूर आणि पायतणाचे माग याचा मेळ शोधीत रान धुंडाळीत हिंडूं लागला.

दिवस मावळायच्या सुमारास नामज्या सताच्या रानात आला आणि म्हणाला, "लागला बर का पत्त्या चोरट्याचा!"

"कोन र ?"

"ह्या माग !"

"आ ? ते र कशावरन ?"

"अगदीं बराबर हाय. कालवड त्येनच चारली !"

"अर, पन त्येच्यापशीं एक गायबी हाय आन कालवडबी. गाय सोडून नुसती कालवडच त्यानं कशी आणली चारायला ?"

"गाईला तुमच्यातलच बाटुक उपटून नेलय जाताना कवळाभर !"

"खर ?"

"अगदीं खर !"

"मला पटवून दे !"

"हे बगा. खूर बारीक हुतं का न्हाई ? मग ती कालवडच. एवड तर तुमाला पटल. आता कालवड आत पिकात शिरल्यावर जाल्या वक्ती तरी तिला धरन्यापायीं गडी आत शिरला असता का न्हाई ?"

"व्हय, त्याबगार जनावर नेणार कसा ?"

"हग अस्सं. आन् तुमच्या रानात तर पायतनाचा माग नव्हता. गड्यानं कालवड भायेरनच बोलावून घेतली असली पाहिजे. आन् अशी 'ये' म्हतल्यावर येनारी कालवड ह्याची हाय हे तुमाला ठाव हाय !"

"व्हय. म्होर."

"पायतानाचा आन खुराचा संग-सग माग बघत मी त्या दिशीं गेलो तवा जागोजाग बाटकाचीं ताट घावली. ती ह्याच्या कवळ्यातनच पडली असली पायजेत. आन मी त्येच्याकडं शेन आनन्यापायीं माज्या बायकुला धाडली. ती शेन घेऊन आली तर त्यात सगळ कवळ जोंधळं ! बोला, मग ह्याशिवाय हे काम दुसर कुनाच ? आन मागसुदीक त्येच्याच खोपटापशीं आनून भिडवलाया मी !"

"मग गड्या पटलं. ह्याचच काम !"

चोर सापडल्याच समाधान सताला झाल. त्यान आणि नामज्यान चिमूटभर तमाखू खाल्ली आणि पुढचा विचार ठरवला.

"आज घेतो बोलावून देवळापुढं."

"व्या. तो तसा 'व्हय' म्हनायचा न्हाई पर !"

"कसा म्हनत न्हाई बघतों कीं. पायरी शीव म्हनतो मारुतीची, मग ?"

"ते बगा आता तुमच तुम्ही. आमच काम आमी बजावलं !"

"बजावलच गड्या."

मग सता उठला. नामज्याहि उठला. जाता जाता कवळाभर बाटुक त्यानं मागितलं. सतानहि दिलं. नामज्याच्या घरी काहीं जनावर नव्हत. पण बाटुक वाण्याला देऊन त्याच तो कांहींतरी आणणार होता. बिड्या, तमाखू, किंवा गूळ.

रातीं जेवणखाण आटपून हऱ्या माग भिताडाला टेकून बसला होता. चिलीम ओढत होता. त्याची हारदमखव्याल बायको आज रात्री कुणाच्या रानात जावं आणि काय चोरून आणावं याचा विचार करीत होती आणि एकीकडे तान्ह्या पोराला पाजत होती. हऱ्यासुद्धा चिलीम ओढत गप्प बसल्यासारखा दिसत होता खरा, पण त्याचा डोळा सभा परटाच्या परड्यात होता. तिथ वैरणीची जी गंज होती त्यातले दहा-पाच पाचुदे हाणायला हरकत नव्हती. रात्रीं-अपरात्रीं, काट्याच्या कुडावरून परड्यात उडी मारण सोप होत. आणि मुख्य म्हणजे सभा परीट आपल्या बायकोसह कुठल्याकी जत्रेला गेला होता. तेव्हा त्याला हा पत्ता लागण्याची शक्यता नव्हती.

एवढ्यात बाहेरून आवाज आला, "हरीबा हाय का ?"

हऱ्यान चिलीम विझवली आणि तिरसटून विचारलं, "कोन हाय ?"

"मी तराळ हाय, देवळाम्होर बोलवलया तुमास्नी !"

—चावडीवर? कशासाठी?

"काय र येताळा, काय काम हाय ?"

"काय कीं जी. मला काय ठाव न्हाई. मडळी बसल्याती समदी गावातली. आबा पाटलानीं मला तुमास्नी हळी मारायला सागतलं."

हऱ्याला काय काम असेल याची कल्पना येईना. तरी तो उठला. मुंडास गुंडाळून बाहेर पडला. तराळाच्या मागोमाग देवळापुढं गेला.

फिकट चादण होत. त्या प्रकाशात त्याला देवळापुढच्या वाळू पसरलेल्या कट्ट्यावर, देवळाच्या पायरीवर आणि जोत्यावर मंडळी बसली आहे एवढं दिसलं. कोण कोण आहेत हे ओळखं मात्र आलं नाही. तो आपला खाली उभा राहिला आणि मुंडक वाकवून म्हणाला, "म्हाराऽऽऽजू."

"रामराम" "रामराम" असे चार दोन आवाज आले आणि धूर्त हऱ्यान त्यावरून ताडल कीं, आबा पाटील आहेत, पाडु न्हावी आहे, जोतिबा दयाळ आहे. आणि हे तिघेजण गावातले कारभारी आहेत. त्यावर नमूनच तो बोलला, "मी हऱ्या माग आलुया."

कोणी तरी खाकरल आणि थुंकल.

आणि एक करडा, हुकमी आवाज बेतान उठला, "हऱ्या !"

"जी."

"बेस्तरवारी रार्ती घरींच हुतास का?"

हऱ्या मनीं चमकला. काहींतरी बिलामत आली!

"व्हय जी, घरींच हुतो."

"मग कालवड घेऊन कोन पोरगी गेली हुती का बायकू?"

जास्तच बुचकळ्यात पडलेला हऱ्या बोलला, "कुठं?"

मग दुसराच एक कावेबाज आवाज ऐकू आला, "अर, चादनी उगवायच्या अगुदर कालवड हिंडवून कुनी आनली? तू, का तुज्या बायकून, का पोरीनं?"

हऱ्याच्या मनात लख्खन प्रकाश पडला. रात्री सताच्या रानात कालवड चारल्याच आणि बाट्टुक आणल्याच या लोकाना कस कळल? बायकुला माहित नाही. कुणी वाटेत बघितलहि नाहीं. मग? त्यान उडवून लावल, "रार्ती कोन जातय् रानात? इकती लाडकी न्हाई माजी कालवड!"

पुन्हा पहिला आवाज आला, "सताच्या रानात जाऊन कालवड चारलीस का न्हाई?"

"रार्ती घोंगड्यावर पडलो ते सकाळीं उन पडल्यावर जागा झालो. चार रोज झाल, थडतापान बेजार केल्या मला. आन् मी कशाला रातच रानात जातोया जी?"

इतका वेळ सता गप्प बसून होता. तो एकदम बोलला, " तसा न्हाई कबूल होनार त्यो. नाकाडावर जोडा द्या एक ठेवून. "

त्यासरशीं दुसरा आवाज आला, " तसं–तसं नगं सता, तू गप बस. "

आणि मग पुन्हा दयाळान विचारलं, " हऱ्या, खर साग, कालवड चारलीस का न्हाई ? "

" जी, न्हाई. "

" घेतोस लेकराची आण ? "

हऱ्याला वाटल, काय आण वाहिली म्हणून लेकरूं मरत नाही आणि मेल तरी होईल पुन्हा. त्याला काय तोटा ? आजची वेळ तरी मारून नेली पाहिजे. तो कळवळ्यानं उत्तरला, " कर न्हाई तर डर कां ? लेकराच्यान् मी चारली न्हाई कालवड ! "

आणि सता संतापून उटला. बोलला, " लेका, काय लाज ? अब्रू ? पोटच्या पोराची आण घेताना काय वाटल न्हाई तुज्या जीवाला ? चोर कुठचा ! "

हऱ्यान त्याला चापला, " येडं वाकडं बोलं नगा. कुनी बघतलया मी कालवड चारलेली ? "

मग नामज्या उठून उभा राहिला आणि म्हणाला, " हरीबा, लबाड बोलून का मिळतया ? मग्ळ कबुली द्या. माग तुमच्या घराकड आलाय ! "

पुन्हा दयाळ समजूतदारपण बोलला, " अर ये शेन्या, गप साग मी चारली म्हनून. तुला कुनी फासावर देत न्हाई. हो मोकळा ! "

हऱ्याच मन डचमळूं लागल. गमोशान माग घरापर्यंत आणला त्याअर्थी आणखी इतर खाणाखुणा त्यानं हेरल्या असणारच. चुकवाचुकवी करण्यात हंशील नाही. प्रकरण अंगाशी बेतल. पण ओढून तर बघू—

" तुमी सागत असाल, तुमचा जर आग्रेव असल, तर मी 'होय' म्हणतो. पन खर म्हनाल तर मी कालवड चारली न्हाई ! "

मग नामज्या पुढ सरसावला. कारण लबाडी त्याच्यावर शेकणार होती.

" समद्या पांढरीदेखत मी सागतो कीं, हेच्या पायतणाचा माग मी हेरलाय्. कालवडीचाबी माग घावलाय्. ह्यो लबाड बोलतोय्. 'परमान' करायला लावा."

'प्रमाण' करायला लावा, मारुतीची पायरी शिवून बोलायला सांगा, ही नामज्याची सूचना अखेरची होती. त्याला दुजोरा सतान दिला.

"हो हो, करु द्या परमान. मारुतीची पायरी शिवून सांगू द्या, 'मी कालवड चारली न्हाई' म्हनून. तसं जर सांगतलं तर माजं नुकसान आलं भरून !"

मारुतीच्या पायरीला हात लावून खोटं बोलायचं म्हणजे मोठी आफत. अशीं खोटी 'प्रमाण' केली कीं हटकून काहींतरी बरवाईट होणार. घरातलं माणूस दगावेल, स्वतः मरेल किंवा खोपटाला एकाएकीं आग लागेल! मारुतीचं हे देवस्थान अतिशय कडक अशी प्रसिद्धि. गावात काहीं उदाहरणहि तशीं घडलेली. या साऱ्या गोष्टी हऱ्याला माहिती होत्या. त्याची त्यावर श्रद्धा होती !

तो काहीं वेळ निमूट बसला आणि मग पडल्या आवाजात म्हणाला, "मायबाप, एकवार लेकराला माफी द्या. कालवड चारलीया मी !" त्याबरोबर हलकल्लोळ झाला. शिव्यांचा भडिमार हऱ्यावर झाला. तो दयाळानं शांत केला आणि मग तो निश्चयानं म्हणाला,

"हऱ्या, गड्या, हे अगुदर सांगतलं असतंस तर माफी झाली असती. पन आता त्याचा उपेग न्हाई. तू दंड भरला पायजेस."

हऱ्या गयावया करून म्हणाला, "नगा जी गरीबाला मारु! मी कुटला आनावा पैका ?"

"छ्या छ्या ! तें काय न्हाई. दंड दिला पायजेस. काय हो, मंडळी ?"

सर्व मंडळींनी संमति दिली.

"हऱ्या, दंड म्हणून मारुतीच्या तेलाला चार घडं तेल दे !"

"कुटलं इतकं द्याव जी गरीबान ? मला खायला आन न्हाई घरात !"

"तें काय चालायचं न्हाई ! तेल दिलं पायजेस. बरं का रं ये बापू गुरव, तूं तेल घे उद्या हेच्याकडनं. काय, हऱ्या, हाय का कबुली ?"

"आता तुमचं मोडून कुटं जावं जी ? देतो, पण जरा सवडीनं घ्या !"

"बराय्, जा, सवडीनं दे !"

वाटाघाट झाली. तंटा मिटला. दंड म्हणून मारुतीच्या देवळातल्या रोजच्या दिव्याला चार धडे तेल देण्याचं हऱ्यानं कबूल केलं आणि मताचं नुकसान भरून दिलं. गावकरी मंडळीनं योग्य तो न्याय दिला !

मंडळी इतर गप्पा करू लागली तेव्हा हऱ्या उठला आणि घराकडे आला. अंधारात पटकुरावर पडलेल्या बायकूला म्हणाला, "मागे, परटाच्या परड्यातल्या वैरणीचा काटा काढायला होवा. दंडाचं तेल दिलं पायजे. वैरण वाण्याच्या दुकानी घाल आन तेल आन !"

# काय सुदीक गेलं न्हाई

म्हाताऱ्या ग्वालान वाढलेली भाकरी आणि माशाची तिखट आमटी खाऊन पोरांची पोट तुडुंब झाली. खमीसाच्या बाहीनं नाक पुशीत आणि तोंडान हाहू फाफू करीत ती पुढच्या सोप्यान आली. तिथं दिवा नव्हता. पण गुडूप अंधारातहि करीमला अंथरुण बरोबर सापडल. तो आपला एकटाच सारं पांघरुण घेऊन गप्प पडून राहिला.

अबदुल्ल डोळे ताणून बघितल. पण त्याला करीम आणि अंथरुण दिसल नाहीं. अदमासान चाचपडत जाऊ लागला, तस जात खटूकन पायाला लागलं. नडगीवर हात चोळीत तो कळवळला,

मग "अगे मा गे..."

छोटी शहाजादी अंधारात भ्याली आणि रडायलाच लागली. तसा अकबर मोठमोठ्यान हाका मारायला लागला,

"करीम, ये करीम—"

मग करीम खुदकन हसला. दोन्ही तंगड्या हवेंत उडवीत म्हणाला,

"आगे आव ना! हतं तर हाय बिछाना." तसा सगळ्याना धीर आला. शहाजादी केकाटली,—

"आमकू दिकता नहीं–"

करीमनं एक सफाईदार कोलांटी घेतली आणि उटून सर्वांना अंथरुणावर आणलं लांबच लांब पसरलेल्या सुताड्यावर सगळीं पटापट पडली. सर्वांना पांघरायला एकच भली मोठी पासोडी ग्वालानं तयार केली होती. तिची ओढाओढ झाली. रडारड आरडाओरड झाली आणि मग सर्वांना नीट पांघरुण मिळाल. शहाजादीचे पाय उघडे राहिले नाहींत, पण आपण कडेला राहिलों म्हणून ती नाखूष झाली.



कडेला असल म्हणजे भुताला चटकन् ओढून नेता येतं ! मग कडेला कोण आणि मधे कोण यासाठीं तंटा झाला. अखेर करीम आणि अबदुल पुस्तकातल्या 'बंधुप्रेम' धड्याप्रमाणं वागले. शहाजादी आणि अकबर यांना मधे जागा मिळाली.

अंगात ऊब आली. माशाच्या तिखट आमटीनं पोळलेली तोंडं निवली. मग अब्दुल म्हणाला,

" मी सकाळीं ओढ्याला जानार. लोटाभर मासं मारुन आननार ! "

त्याच्या बढाईची अकबरला मोठी मजा वाटली. त्यानं विचारलं,

" गळ न्हाई, जाळं न्हाई. कशानं मारनार ? "

" मी खोल पान्यात जानारच न्हाई. एक लांबडी लवचिक सळई घेऊन धारंत उभा रहीन. असा मासा तळपत आला कीं चपकन् सळई मारीन ! "

अकबरला हें बोलणं पटलं. सकाळी अब्दुल लोटाभर मासे मारून आणणार याविषयीं त्याला शंका उरली नाहीं. पण शहाजादीला शंका आली. तोंडावरचं पांघरूण न काढताच तिनं विचारलं,

" आन् ताब्याभर माशाचं कोरड्यास तू एकलाच खानार अब्दुल ? "

" हो हो, मी आन् खाला मिळून खानार. "

शहाजादीला खूपच वाईट वाटलं. ती चिडली आणि चिमकुरे काढण्यासाठीं अब्दुलचा पाय शोधू लागली.

मग अकबरला एकदम एक कल्पना सुचली. तो म्हणाला,

" शाजादी, खाऊं दे त्याला मासं. आपल्या पांढऱ्या कोंबडीला मी आज पसाभर दाणं चारलेत. ती उद्या चांगली चार अंडीं घालील. आपण खानून-कडन पोळी करून खाऊ, अं ? "

इतका वेळ गप्प असलेला करीम आता बोलू लागला. म्हणाला,

" मला एक गम्मत ठाव हाय ! "

शहाजादीनं उत्सुकतेनं विचारलं,

" काय ? "

अब्दुल म्हणाला,

" कळली आमाला. "

करीमला एकदम धक्का बसला. आपणाला ठाऊक असलेलं गुपित अब्दुलला कसं कळलं ?

"न्हाईच."

"हो हो, मला ठाव हाय."

"साग बघू."

"आपली म्हैस वेनार हाय!"

करीम मोठ्यान हसला.

"थुत्! ही नव्हंच!"

अबदुलला आश्चर्य वाटलं. यापेक्षा आणखी कोणती गम्मत असणार? आणि ती फक्त करीमलाच माहीत आहे?

"मग काय, साग बघू तू तरी!"

"हरलास?"

"हो, हरलो."

"मेल्या कुत्र्याच हाडुक चोखलस?"

"हो हो, चोखल. साग आता!"

"आरं, चिच्यान आपल वरलीकडच शेत बामणाला इकलय्. त्याचे पोतभर पैशे घरात हैत!"

शहाजादी, अकबर आणि अबदुल याच्या आश्चर्याला पारावार उरला नाही. पोतभर पैशे? अगे मा गे! शहाजादीला आपल्या अंधाऱ्या माळींत घातलेला पैशाचा ढीग दिसू लागला. चकचकीत रुपयाचा ढीग! आणि मग ती त्यात कुदू लागली. सुगी झाल्यावर धान्याच्या राशींवर कुदावं तशी!

अबदुलनं चिच्याकडून चागले दोन तावडे पैसे मागून घेतले आणि ते पेन्सलीच्या भुकस्यान घासून घासून चकचकीत करण्याच्या उद्योगाला तो लागला.

अकबरन चिच्या बाहेर गेल्याचं बघून पोत्याची उसण हळूच उसवली. आणि खमिसाचा खिसा भरून पैसे घेऊन तो धूम पळाला. वाण्याच्या दुकानात गेला आणि चागलं ओटाभर डाळ, चुरमुरे, बत्तासे घेऊन ओढ्यावर गेला. वाळूंत बसून सगळे चुरमुरे खाऊं लागला गपागप्. आणि गोड बत्तासे तोडीं लावूं लागला!

करीम त्रिच्याबरोबर भांडभांडला. म्हणाला, आमचा बाप मेला म्हणून तूं जमीन विकलीस. माझा वाटा दे. त्रिच्या रागावला आणि चिपाडान बडवूं लागला. तसा करीम त्याच्या मनगटाला कडकडून चावला. मग ग्वाला आली. तिनं भांडण सोडवल. करीमला अर्धपान पैसे मिळाले. ते घेऊन तो अंड्याचा व्यापार करण्यासाटीं मुंबईत जायला निघाला. गाडींत बसला. झुक् झुक् झुक् झुक् . .

गाडी चालू झाली. हादरे बसू लागले. पाळणा हलू लागला आणि मग करीमला झोपच लागली.

तांबडा पैसा चकचकीत करता करता अबदुल झोपला.

चुरमुरे ग्वाता खाता अकबर झोपला.

आणि पैशाच्या ढिगात कुदता कुदता दमून शहाजादीहि झोपली.

तीं चार बापावेगळीं पोर कुत्र्याच्या पिलासारखीं एकमेकाच्या गळ्यात गळे घालून झोपलीं. अगदीं गाढ झोपलीं !

मग दडकीच्या दोन्ही खिशात हात घालून पायातल्या नव्या जोड्याचा फटाक् फटाक् आवाज करीत बाबालाल आला. चूळ भरून ग्वाना - ग्वाण्यास बसला. लामणदिव्याच्या उजेडात मटामटा ग्वाऊ लागला. म्हातारी खाली त्याच्यापुढच बसून राहिली होती. पोरबाळाना जेवण वाढण, सुनाना रोजचा शिधा आपल्या हातान कासून देण, दुधदुभत साभाळण हीं काम म्हातारी करी. घरकारभार तिन अद्याप आपल्याच हातीं ठेवला होता.

हाताचा मुटका गालावर टेकून बसल्या बसल्याच तिन विचारलं,

"आता भायेर जानार हायेस का ?"

तोंडातला घास गिळून बाबालाल म्हणाला,

"व्हय. पलीकड हमीदभाईच्यात घटकाभर बोलत बसायला जाणार हाय. का गे ?"

म्हातारी कांहीं बोलली नाहीं. पण तिला म्हणायचं होत कीं, घरात जड-जोखीम आहे, रात्रीं फार वेळ बाहेर राहूं नकोस. पण बाबालाल शेजारच्या हमीदभाईकडेच जाणार होता. एका हाकेच्या अंतरावर. आणि या खेडेगांवात भीति तरी कशाची? चोऱ्यामाऱ्या चुकून कधीं आट बारा वर्षातून होत. त्याहि

कुठं गावच्या आजूबाजूला वाड्यावस्तीवरच. तिच्या हयातींत तर गावात मोठी चोरी झालेली तिला आठवत नव्हती. आणि चोरी व्हावी असं गावात तालेवार होतं तरी कोण ? सगळं गांव गरीबच होतं. रानामळ्यात कष्टून पोटं भरणार. त्यालाच्यात तरी काय होतं ? आता बाबालालनं नको म्हणत असताना शेत विकलं होतं, त्याचे हजार बाराशें रुपये घरात आले होते, म्हणून भीति. तेहि उद्या दुसऱ्या तुकड्यात विहीर खोदण्यापायीं जाणार होते. चार आठ दिवस, फार तर महिना पधरा दिवस जोखीम होती.

म्हातारी म्हणाली,

" वडारला इसार देऊन टाक. तडाख्यात काळ्या तुकड्यात विहीर हूंदे !"

" देतो तर. उद्या परवा कामाला सुरवात करतो."

" कर बाबा. मळ्याशिवाय कुणबिकी नाही. जिराईत रानाचं काय घेऊन बसलास ? पाऊसपानी झालं तर मूठभर पीक येनार. नाहीतर माती !"

" व्हय. त्यासाठीच तर तू नग नग म्हनता मी जमीन इकली. त्यो सगळा पैका हिरीत घालतो. मळा हूदे झोकात !"

"हूदे र लेकरा. घरात भाजीपाला हुईल. माजीं पोरबाळं हुरडा, शेंगा खात्याल !"

" अग, गावात समद्यास्नी मळं हैती, आपल्यालाच नाही. पोराना काय तरी करून ठेवलं पायजे !"

"व्हय बाबा. कर एकदा बागाईत. मी डोळ्यानं बघीन आन् सुखानं जीव सोडीन."

अशीं प्रश्नोत्तरं झाली आणि जेवण आटोपून बाबालाल बाहेर पडला.

खाली, बाबालालची बायको खातून, पोराची रडकी आई जरणा यानींहि उरलं सुरलं खाऊन घेतलं.

पासोड्या विणायच्या मागापाशीं घोंगडं अंथरून म्हातारी तपकीर ओढत बसली. लवकरच होणाऱ्या आपल्या मळ्याविषयीं विचार करत.

पलीकडे खातून पोराला पाळण्यात टाकून झोके देऊ लागली. दुसरं तिच्या मांडीवर झोपलं.

जरणानं खरकट्या पितळ्या, तवा, गिलास गोळा केली आणि मागल्या दारच्या आडावर जाऊन ती तीं घासत बसली.

बराच वेळ गेला.

गावातला गलगा आता बंद झाला होता. शेजारी हमीदभाईच्या कट्ट्यावर लोक बोलत बसले होते, त्याचा आवाज येत होता. आणि घरामागल्या ओढ्यावर टिटवी ओरडत होती.

पोराला झोके देता देता खातून पेंगली आणि दुसर पोर मांडीवर घेऊनच, अवघडल्या स्थितीत झोपली. पाळणा मात्र हळुहळू हलत होता. वरच्या कड्या कुरकुच कुरकुच वाजत राहिल्या होत्या.

म्हातारीला आता जांभया यायला लागल्या होत्या. जड आवाजात ती खातूनला बोलली,

" पहाट लवकर ऊट ग. दळाच हाय." आणि घोंगड्यावर आडवी झाली.

जरणाचीं भांडींहि उजळून झाली. हातपाय कोरडे करून ती आली आणि पोराच्या पायथ्याला थोडीशी जागा होती तिथ लवडली आणि घोरूहि लागली.

म्हातारी अर्धवट जागी असतानाच तिन बाबालालच्या जोड्याचा आवाज ऐकला. त्यानं काहीं तरी विचारल. तिन काहींतरी उत्तर दिल. मोटा दरवाजा आतून लावून घेऊन बाबालालन त्याला कुलूप लावल. माळीलाहि कुलूप लावलं. किल्ल्या उशाशी ठेऊन दिव्याला निरोप दिला.

"या अल्ला, या रहीम—" करीत तोहि अंथरुणावर पडला आणि झोपला.

अमावास्येची काळी रात्र चांगली रंगली. गडद झाली. अंधाराची जाड घोंगडी पांघरून बाबालालच घर झोपलं. आता कुणालाच जाग नव्हती. खुराड्यात पंख पांघरून कोंबड्या झोपल्या होत्या. दावणीला शेणानं मळलेल्या चिपाडावर रेलून म्हैस झोपली होती. भितीच्या कडेला चोपलेल कुत्र अंगाच वेटोळं करून झोपलं होत. आणि सुस्तावलेली मांजरीहि चुलवणाशीं बसल्या बसल्याच पेंगली होती. आता कुणालाच जाग नव्हती. कुणीच सावध नव्हत. दिवस-भराच्या श्रमान सगळे गाढ झोपले होते—अगदी गाढ!

कुत्र्याच्या भुकण्यानं बाबालालची झोप चाळवली. पडल्या पडल्याच तो ओरडला,

"अरं हाड् हाड्, तेरी."

आणि दुसऱ्या अंगावर वळून तो झोपला.

म्हातारीन टक् डोळे उघडले. अंधारातच कावरीबावरी होऊन ती बघू लागली. मग एकाएकीं कुत्रं भयंकर ओरडलं. कचरड्यात धोंडा बसावा तसं केकाटलं.

म्हातारीच्या काळजात धस्स झालं. चटकन ती अंथरुणावर उठून बसली.

...भिताडावरून काही तरी खाली कोसळलं. धापाधप आवाज झाले. दुसऱ्या क्षणीं अंगणातून वीजबत्ती चमकून पेटली. एक, दोन, तीन! लखलखीत भाल्यासारखे प्रकाशझोत बाबालालच्या घरात घुसले. तसे म्हातारीन डोळे गपूकन मिटले आणि भीतीनं किंकाळी फोडली.

"बाबल्या, अगं खातून, अरं जागं व्हा, जागं व्हा!" आणि मग खाडकन् आवाज झाला. म्हातारीच्या डोस्क्यातन एक भयंकर कळ उठली. गुगु—कानात आवाज होऊ लागला. डोळ्यापुढं हिरव्या निळ्या चांदण्या चमकल्या. मग ती गुरासारखी ओरडली. पाटींत धोपटी बसलेल्या गाईसारखी हंबरली. तसा दुसरा तडाखा बसला. मागोमाग दबका आवाज आला,

"गप थेरडे. तोंड बंद कर. न्हाईतर जीव घीन!"

पण म्हातारीला तें काहींच ऐकूं आलं नाहीं. गलोलीचा खडा लागलेल्या पाखरासारखी ती कटकन् अंथरुणावर पडली. नि तिचे काटकुळे हातपाय थरथर कापत राहिले. तोंडाला फेस आला!

बाबालालच्या छातीवर एकदम भार पडला. डोळे उघडताच त्याला जाणीव झाली कीं, आपल्या गळ्याला काहीं गारगार लागलं आहे. अंधारांतच तो तें चाचपून पाहूं लागला तशी त्याचीं बोटं करकन् कापली. हात रक्तबंबाळ झाला. तेवढ्यात कुठून तरी प्रकाशाचा भाला फेकला गेला आणि बाबालालला चक् दिसलं. अक्राळविक्राळ चेहऱ्यामोहऱ्याचा काळाकुट्ट माणूस त्याच्या छातीवर बसला होता. हातातल्या सुऱ्याचं टोक त्यानं बाबालालच्या गळ्यावर टेकलं होतं. बाबालालनं डोळे गपूकन मिटले. त्याचं अंग एकदम थंडगार पडलं.

वरचा माणूस ओरडला,

"किल्ल्या कुटं ठेवल्यास ? दे काढून!"

तें ऐकू आलं. किल्ल्या काढून दिल्यावाचून गत्यंतर नाहीं हेहि समजलं. पण बाबालालचा हात हालेच ना. तोंड उघडेच ना. तसा त्या राक्षसानं एक जबरदस्त ठोसा त्याच्या तोंडावर लगावला. आणि एकाएकीं बाबालालची गेलेली वाचा परत आली. अंग गरम झालं. डोळे वासून तो भयंकर ओरडला. मग घाईघाईनं प्रश्न आला,

"आटप, बोल. का घेऊं जीव?"

"नको नको. मी पाया पडतों तुमच्या. मला मारूं नका. मला नका हो मारूं!"

आणखी एक ठोसा.

"किल्ल्या काढ. कुठाय् पैका?"

"सांगतों—सांगतों."

मग बाबालालनं थरथरत्या हातानं किल्ल्या दिल्या. बोबड्या शब्दांत पैसे कुटं आहेत हेहि सांगितलं.

"चूप पडून रहा. मेल्यामारखा. हाललास तर कुऱ्हाडीनं तुकडे करूं!"

बाबालाल पडून राहिला. हीव आल्यासारखा थडथडत. डोळे घट्ट मिटून घेऊन पडून राहिला. डोळे वर करून त्यानं बघितलंहि नाही.

मग माळीचं दार उघडलं गेलं. धडाधड आवाज होऊं लागले. उतरंडी ढासळल्या जात होत्या. कोनाडे उकरले जात होते.

दोन्ही पोरंना दरादर ओढीत खातून धान्याच्या कणगीच्या आड गेली. आणि दुखावल्या मांजरासारखी सांदीला घुसून बसली. पण पोरं किंचाळायचीं थांबलीं नाहींत आणि तिला भडाभड ओकाऱ्या व्हायला लागल्या. लुगड्याचा बोळा तोंडांत घालून त्या थांबेनात. आतडी तुटूं लागलीं.

सोप्यांतली पोरं जागीं झाली आणि त्यांनीं गोंधळ केला. 'मा गे, खाला गे' करीत तीं अंधारात कुणीकडल्या कुणीकडं गेली. करीम जोत्यावरून धाडकन् खालीं पडला. अबदुल धडपडत म्हशीच्या पायात गेला. तशीं तिनं ताडकन लाथ झाडली. ती पोटांत लागली आणि चिपाडाच्या ढिगात पोरगं बेशुद्ध

होऊन पडल. शहाजादी पासोडीच्या गळाठ्यात गुरफटली आणि ओरडून तड-फडून तिचा जीव अर्धमेला झाला. आणि बिचारी जरणा, 'माजी पोर, माजी पोर' करीत उगीचच अंधारात चाचपडूं लागली.

म्हशीनं दाव तोडलं. लाथा झाडीत ती अंगणातल्या अंगणांत धडपडूं लागली. तिच्या झपाट्यान खुराड कोसळल आणि भेदरलेल्या कोंबड्या 'टो टो' करीत फडफडू लागल्या. पळू लागल्या.

मग कुणी टो टो बोंब ठोकली.

कुणी गहिंवर घालून रडूं लागल.

आजूबाजूचीं कुत्री जागी झाली आणि जोरजोरान भुकूं लागली. त्या भुक-ण्यान लिंबावर झोपलेले कावळे जागे झाले आणि त्यानीं गोगाट केला. हे सारे आवाज एकमेकात मिसळून एकच गोंधळ झाला. एकच गलका झाला.

गावातले लोक जागे झाले आणि बाबालालच घर पेटल कीं काय, म्हणून बघायला आले. धावत पळत. घराच्या चारी कोपऱ्यावर चार चोरटे हातात गोफणी घेऊन उभे होते. पायागती गोट्याचे ढीग त्यानी मुद्दाम रचले होते. माणसाचा सावट येताच त्यानीं चौफेर गोफणीचा मारा केला. धडाधड आवाज होऊं लागले.

एका गावकऱ्यापुढ बदकन धोंडा पडला. बर, नाही तर कपाळमोक्षच व्हायचा. तो विलक्षण घाबरला. गरकन् वळला आणि धूम पळाला. पळता पळता ओरडला,

"अर, बाबालालच घर फोडल र चोरट्यानीं!" आणि पार मारुतीच्या देवळातल्या गाभाऱ्यात जाऊन मूर्तीच्या माग लपला.

मग गावातल्या सगळ्यानाच कळल कीं, बाबालालच्या घरावर दरवडा आलाय्. सगळ्याच्याच तोंडचं पाणी पळाल. जो तो आपल्या घरात कवाड लावून बसला.

म्हातारा बाबू बामण आपल्या अंगणात उभ राहून पाखर बुजवायच्या चाबकाचे फडाफड आवाज काढीत राहिला. त्याला वाटलं, या आवाजानं चोरटे भितील.

हमीदभाईला रहावेना. तिरमिरीसारखा तो दार उघडून बाहेर पडला. त्याची बायको ओरडली,

" अवं, तुमी एकल जाऊन का करताय? नगा जाऊ ! "

तरी तो गेलाच. आणि एक धोंडा भिरभिरत आला. त्याच्या कानशिलावर बसला. तसा तो खाली पडला.

मग रामोश्यानीं हिम्मत केली. हातात काठ्या, कुऱ्हाडी घेऊन ते धावत, ठेचाळत आले. ओढ्याच्या अंगानं खाली उतरून चोरटे पसार होत होते. तें बघून रामजी ओरडला,

" थुत् भडव्यान्! पळता कशाला ? ऱ्हा उभं तत ! "

मग तिकडून चोरट्यानी साद दिला,

" अरं, बायकुचं कुकू पुसून ये बेरडा ! "

आणि गोफणी सरसावून त्यानी दगडाचा भडिमार केला. गारा पडाव्या तसे गोटे पडू लागले. रामोश्याचीं अंग ठेचून निघाली. तेव्हा तेहि धूम तकाट घराकडे पळाले. रामजी म्हणाला,

" अर, गडी मायदाळ दिसत्यात. धा वीस तरी हैती. तेंच्या म्होर आपल काय चाल्नार न्हाई ! "

सगळे आपआपल्या घरात गेले. सगळ गाव गप्प झालं. भेदरल्या सशा-सारखं छातीचे ठोके ऐकत बसून राहिल.

शेत विकून आलेले पैसे, दागदागिने, कपडेलत्ते—सगळ घेऊन चोरटे पसार झाले. वावटळीसारखे आले आणि मारझोड, नासधूस करून गरगरत निघून गेले. नाहींसे झाले !

—पहाट फुटली आहे. चिमण्या कुलकुलत आहेत. हळुहळू दिसू लागलं आहे. बाबालालच्या घरातली सगळीं माणस एका जागी गोळा झालीं आहेत. भीतीन दाबलेले त्यांचे गळे आता मोकळे झाले आहेत. एकमेकाना मिठ्या मारून तीं रडत आहेत. एकमेकांना कुरवाळीत आहेत.

बाबालाल भ्रमिष्ठासारखा बसला आहे. लोक पुसत आहेत,

" बाबालाल, तुजं काय गेल, नीट बघितलंस का ? "

तो म्हणतो आहे,

" बाबानू, माझं काय सुदीक गेल न्हाई, काय सुदीक न्हाई !"

चोरी झाली ती झाली. घर धुवून निघाल. पण ही गोष्ट चार जणाना सागावी, तालुक्याला वर्दी द्यावी, तर पस्तावण्याची पाळी यायची. शिपायी-फौजदाराना काम होण्यासाटीं पैशे चारायचे, जेवणं द्यायचीं. तालुक्याचे हेलपाटे करायचे. आपण, आपल्या बायका, सगळ्यानी कोर्टापुढं जाबजबाब द्यायचे. या व्यापात आणखी कर्ज व्हायचं. रानामाळातल्या कामाचा खोळंबा होऊन नुकसान व्हायचं. एवढं करूनहि चोरीचा तपास लागणार नाहीं हे नक्कीच. हे सारं डोक्यात येऊन बाबालाल खोटच सागतो आहे,

" बाबानू, माझं काय सुदीक गेल न्हाई, काय सुदीक न्हाई !"

# बेत

महारवाड्यातल्या आपल्या खोपटाच्या भितीला लागून सद्या बसला होता. शेजारीं इटुबाहि बसला होता. दोघांचीहि अंग उघडी होतीं. कमरेभोवतालीं गुंडाळलेले हात दोन हात धडपे सोडले, तर दोघांचीहि अंग उघडीं होतीं. ऊन मोठ गमतीदार लागत होत. अंगातल मास गरम होत होत.

संद्या चाळीस वर्षांचा होता. रुद खांद्याचा आणि खुजट. त्याच्या गालाचीं हाड वर आलीं होती. डोळे बारीक होत. ओटावर ओठभर मिशा नव्हत्या. दोन्ही कडेला चार चार करडे केस होते. चालतांना तो खालीं मान घालून चाले आणि आपल्या बारीक डोळ्यानीं अस्वस्थपणें इकडे तिकडे बघे.

इटुबा संद्यापेक्षा दोन तीन वर्षांनीं मोठा होता. हाडापेरान लाबार होता. रगानं टार काळा होता. तो चालताना लाबचक टांगा टाकी आणि डावा खांदा उडवी. जेव्हा तेव्हा थुंके.

काळ्या तुकतुकीत पाठीवर उनाचा चपाटा लागून ती खाजू लागली, तेव्हा संद्या टाळला. उफराट्या हातान पाट ओचकारीत म्हणाला, "इटुबा–" आणि तेवढ्यावरच थाबला. बोलताना नेहमीं सावकाश बोलण्याची त्याची ढब होती.

इटुबा गुढघ्याला हाताची मिठी घालून खाली बघत बसला होता. आपल्या पायावरच्या टगरलेल्या शिरा न्याहाळून मनाशीं म्हणत होता,

"च्या आइलीला, खान्यापेन्याच्या आबाळीन गडी खपाप झाला. पाया-वरच्या शिरा पाक दिसायला लागल्या."

ध्यानात आलं तेव्हा मान वर करून त्यान बघितल. सद्याचा निबरट चेहरा काबेबाज झाला होता. मघा सुरू केलेल वाक्य त्यानं पुर केलं.

" गड्या, काय तरी वशीट खाया होव. जीभ आळणी झालीया माजी ! "

इटुबा भुकेन नेहमीं हाडाडलेला असे. काम करायचा त्याला कंटाळा होता. त्याची त्रेपन्नटकली बायको लांड्यालबाड्या करी. बारीकसारीक कामं करून पसा कुडता मिळवी. त्यावरच तो जगे. बायकोची शिवीगाळी कोडग्यासारखी ऐकून घेई आणि आडोशाची जागा बघून ताणून देई.

संद्याच्या बोलण्यावर तो पिवळे दात दाखवून हंसला. बोलला,

" भाकरीचा टुकडा मिळणं मुष्किल, आन् वशीट कुटलं खातुयास बाबलिच्या!"

हें खरं ! भाकरीचा तुकडा मिळण मुष्कील होतं. सुगीसराई लांब होती. पसाभर जोंधळे बाजारात नेले कीं, रुपया येत होता. त्यामुळ चांगले भरण्याचे कुणबी देखील दारात आलेल्या म्हारापोराना, पदरात काहीं न टाकता हुसकून लावत होते. मग कोंबडी किंवा बकर मिळणार कुटन ?

बूड उचलून संद्या चवड्यावर आला. थोडा पुढं सरकला आणि बोटं नाचवीत म्हणाला,

" अर, साकरचा खाणार त्याला देव देणार! फाकड्याच्या जीवाला वाटलं तें खाल्लंच म्हणून समज!"

संद्या अल्पसंतुष्ट होता. सावध होता. एखादा कपडा, भांड, भाराभर वैरण, लाकूड, कोंबडी, असल्या फालतू वस्तूवरच त्याचा डोळा असे. मोठ्या बिलंदर-पणें, सावचीतपणें तो त्या लांबवी. कधीं त्याची चपळाई उघडकीला येई. गावातला एखादा शेतकरी चार शिव्या हासडी. ताकतीनं भारी असला, तर दहा पाच लाथा घाली. पण एवढी किंमत काहीं जास्त नव्हे !

संद्याला एवढ्या जोरानं बोलताना ऐकून इटुबाचा मुखवटा विचारी झाला. अदमासान त्यानं खडा टाकला,

" अमीनभाई मुलान्याचा इलायती कोंबडा हेरला हैस जनू ? पन सबाळ लेका, घावला बिवलास तर जित्ता सोडायचा न्हाई त्यो लाडभाई ! "

" अरं सोड ! घावायला काय कच्च्या गुरूचा चेला न्हाई मी. चालतां चालता काटा काढीन कोंबड्याचा ! "

इटुबा हरकला. कारण त्याचा होरा अचूक निघाला.

"कसं वळकलं ?"

"काय ?"

"अर, चोराच्या वाटा चोरालाच ठाव्या !"

"ऐरं चोर ! अरं, चोरी करावी मर्दानं ! तुज्यावानी मिलमिश्याच काम न्हव ते !"

इदुबाचा चेहरा पडला. चोरीदरोड्याच्या गोष्टी त्याला जमण्यासारख्या नव्हत्या, हे खरंच. पण नेटानं तो बोलला,

"आपन न्हाईच तसल. गळ्यात माळ हाय माज्या. हरामी व्हनार न्हाई आपल्या हातन !"

"आन् हाडकी हडुळकी करतोस ते रं ?"

"त्याला काय बाट हाय ? आपला धदाच तो ! पन खान्यावक्तीं माळ मातूर गळ्यातनं काढून ठिवतो बर का !"

संद्यालाहि हें पटल. मेलेल्या गुराना ओढण, फाडण, त्याचं मास खाणं हा धंदाच. तो करायला पाहिजे. गळ्यात पढरीची माळ असली म्हणून काय झाल ? त्या वेळीं ती काढून दूर ठेवायची म्हणजे भागल ! इदुबा एवढ पाळत होता, हेहि एकपरीनं विशेषच होत !

संद्या आणि इदुबा हे सहसा सचेपणान वागत नसत. आणि ते त्याच्या फायद्याच होत. सचेपणान वागणं हें गैरफायद्याच ठराव, असंच त्यांचं जीवन होतं. फौजदारी कायदा, नीति, मालमत्तेचे हक्क, या शहाण्या लोकाच्या मतं आयुष्यातल्या प्रत्येक क्षणीं लक्षात ठेवल्या पाहिजेत अशा गोष्टी ते कधींहि लक्षात घेत नसत.

मग संद्याचा निश्चय ऐकून इदुबाच्या तोंडालाहि पाणी सुटलं आणि लाचारीनं तो म्हणाला,

"संदीपान, मलाबी खाऊन लई दीस झालं. गेल्या चार आठ महिन्यात गावात जनावरच मेलं न्हाई !"

एवढं बोलून जरा वेळ तो गप्प राहिला आणि मग विलक्षण धादरट-पणानं बोलला,

"बग गड्या, उडव मुलान्याचा कोंबडा, ऑ?"

संद्याचा चेहरा विचारी झाला होता. काळजीच्या स्वरात त्यान उत्तर दिलं,

"कोंबड्याच न्हाई जमायच इटुबा!"

"का र? अर, उद्या आमुशा. भल्या रातीला जाऊ आन् वड्‌ खुराड्यातनं कोंबडा. मुलानी न्हाई सावध हुयाचा. येड्या, बिबीं हतरुनात याच्च टाईंब तं!"

"अर, पन गाडवीच्या, एक कोंबडा आनून कुनाच्या नाकाला लावतूस? तुज्या माज्या घरात मिळून माणस धा. काय वाटनीला येणार? आडजिब माखली आन् पडजिबीन चोंब टोकली अस हुयाच!"

"घरात आणायचाच कशाला? दोघ रानातच शिजवू आन खाऊं!"

इटुबाची ही कल्पना एरवी संद्याला पटली असती. नाही तरी चोरीचा कोंबडा घरात शिजवल्यावर बोंबाबोंब होणारच. तो रानातच शिजवण योग्य. दहा माणसात गवगवा होता कामा नये. पण—

"इटुबा, इतका वाडूळ बोलल्‌ न्हाई, पन आता सागतू. अर, अस्तुरी पोटुशी हाय. तिला खाव वाटतया!"

हा असा तिढा होता! संद्याची काळीबेरी बायको फारा दिवसानीं पोटुशी राहिली होती. आणि तिला काय बाय खाव वाटत होत. रानातली खरपून काळी माती, कारल, वाळुक, भजरोब, नाना पदार्थ खावे वाटत होते. काल रात्रीं फतकल घालून ती बसली होती. बसल्या बसल्याच संद्याला टुकडा वाढत होती. वाढता वाढताच एकाएकीं बोलली होती,

"गावातल्या जित्राबास्नी बि रोगडा येईना. मला कोरड्यास खाव वाटतया, वासना झालीया."

आणि मग संद्यानं तिला सागितल होत, "मी काय तरी येवस्ता करतो."

पोटुशीपणाची ही भानगड ऐकली, तेव्हा इटुबा मनीं उमगला. बोलला,

"संद्या, गड्या, मग मातूर मोटं जित्राब पायजे. अर, कोंबड्यान ऊदबी जळायचा न्हाई. समदा महारवाडा जेवला पाहिजे!"

उनाचा चपाटा आता भलताच लागू लागला होता. ते खाण्यातला गोडवा निघून गेला होता. मारुतीच्या देवळापाठीमागच्या लिंबाखाली जाव आणि गार

सावलींत ताणून द्यावी, असा विचार एकाएकीं इटुबाच्या मनात आला. तो न बोलतां उठला आणि बगळ्याच्या पायानं लांबलचक ढांगा टाकीत गेला !

संद्या उगच खाली मान घालून बसला होता. मनातल्या मनात काहींतरी तंत्र जुळवीत होता. इटुबा उठून गेलायच त्याच्या ध्यानात आलं, पण तिकडे त्यान बघितलहि नाही. जरा वेळान तोहि उठला. बाजूच्या फुपोट्यात थुकला. आणि तरसासारखा खाली मान घालून कुठ तरी गेला !

गणा पाटलाचा खोंड मेल्याची बातमी लगेच सगळ्या गावात झाली. जो तो हळहळला, कळवळला. पाटलाच्या खोंडासारखा खोंड गावात नव्हता. रगान कोमल, अंगान भरला, अक्कडबाज शिंगाचा. पाटलाचा त्याच्यावर भारी जीव होता. लोखंडाच्या पाटींतून पाटील त्याला वरवं दूध पाजीत. हिरव्या कडब्याशिवाय त्याच्यापुढ चिपाड टाकीत नसत. टाणावर बांधलेल्या तट्टासारखा हा कोवळा खोंड रानातल्या झोपडीपुढ सावलीला बांधलेला असे. गणा पाटलाची त्याच्यावर लेकरागत माया होती. असा हा खोंड काहीं आजार नसता एकाएकीं मेला !

खोंड मेल्याची बातमी समजली आणि महारवाड्यातली महार घारवंडा सारखीं पाटलाच्या वस्तीपुढ उतरली. त्यात संद्या होता. इटुबा होता.

पाटलाचा जाणता पोरगा खोंडाच्या तोंडावरून हात फिरवीत म्हणत होता,

“ अर, तुला कदी चार बोटानं शिवल न्हाई ! अरं, तू माज्या घराम्होरं हत्तीवानी सोबत हुतास ! ”

त्याच्या डोळ्यातून धारा वहात होत्या. पाटलाची धाकटी पोरगी गळा काढून रडत होती. पाटलाचं कर्दनकाळ कुत्रं कुणावर न भुंकता उगीच बसून राहिलं होतं. स्वतः पाटील डोईवरचं पागोटं गुढघ्याला अडकवून बसले होते आणि पाटलीण त्यांना सारखी म्हणत होती,

“ अव, पोराला समजावा कीं. कवाधरन रडतया ! ”

पाटलिणीचे हे शब्द अंगणात गुढघे मोडून बसलेल्या संद्यान ऐकले आणि जागचा उठून तो खोंडापाशीं गेला.

मान हलवून चुकचुकला आणि डोळ्यात पाणी आणून पाटलाच्या पोराला बोलला,

"झाली गोष्ट होऊन गेली. रडून ते का माघारी येतया का जी? उठा, न्हेऊं द्या आमाला आता!"

दुःखान वेडा झालेला पोरगा डिवचलेल्या नागासारखा अंगावर आला. ओरडला,

"तुमी चालत व्हा भडवानूं. माझा खोंड द्यायचा न्हाई तुमाकड. तुमी शिवू नका त्याला. मी माज्या पोरावाणी हातान माती देईन त्याला!"

हा भडिमार ऐकून सद्यानं चेहरा अपराधी केला. पण तो जागचा हालला नाहीं. उलट पाटलाकडं मुखवटा फिरवून बोलला,

"आता जी पाटील! सागा कीं हेस्नी काय. माझ्याच अंगावर येत्याती!"

पण पाटील उत्तर देण्याच्या आत पोरगा कडाडला,

"तू हातनं जातूस का न्हाई, सद्या? इनाकारनी माज पित्त खवळू नगंस!"

समोर आशेनं बसलेल्या महारात पुटपुट चालू झाली. इटुबा मनीं चिडला. त्यानं सारे बेत आखले होते. पाटलाच्या खोडातला मोटा वाटा तो घरी नेणार होता. जनावर ओढून टाकण्याबद्दल पाटलानं घातलेले जोंधळे नेणार होता. त्याची सुगरण अस्तुरी भल्या मोठ्या भाड्यांत कोरड्यास शिजवणार होती. ते मनसोक्त खाऊन हा लिंबाच्या सावलीला जाऊन झोंपणार होता. पाटलाच्या पोराला अक्कल नव्हती! असला सोन्याचा घास तो मातींत घालणार होता.

भान न राहून इटुबा ओरडला,

"काय येड का काय तुमी पाटील? आशेनं बसलुया आमी. आमच्या मुखात जाऊ द्या की घास!"

इतका वेळ पाटलाच्या खोडाच एक मनगटासारख हाड दोन्ही हातात मकेच्या कणसागत धरून त्यावरच मास दातलणारा किस्ना सावरून बसला, म्हणाला,

"व्हय व्हय! सोन्यासारखा खोंड का मातींत घालता? होऊं द्या आमास्नी मेजवानी!"

आणि मग मात्र पाटील, पाटलीण आणि पाटलाचा पोरगा यानीं गहजब केला.

"अरं, मानसं म्हनावं का राकीस र तुमाला ? आमच काळीज फाटलंया, आन् तुमी मेजवानीच्या भाषा बोलताया, आ ?"

असं ओरडून आरडून पाटलानीं सगळीं महार हाकलून लावली. पोरानं संतापानं त्याच्यावर ढेकळं फेकली. आणि त्यासरशीं गरिबासारखा बसलेला कुत्रा चवताळून त्याच्या अंगावर गेला. किस्नाच्या कमरेचं अप्र धोतर त्यानं फाडून टाकलं!

ओंगळ शिव्या देत महार पळाली आणि पडलेल्या चेहऱ्यानीं महारवाड्यांत आली!

महारणींनीं सर्पणकाटकी जमवून ठेवली होती. मीटमिरची सौदा गोळा केला होता. त्यांची विलक्षण निराशा झाली. कडाकडा बोटं मोडून त्यानीं पाटलाची आई माई उद्धरली.

इटुबा खालीं मान घालून आपल्या खोपटात गेला, तेव्हा त्याची बायको वसकन अंगावर आली,

"हात् मुडद्या ! कशाला आलास अपेशी तोंड घेऊन ?"

मग तो घरांत ठरलाच नाहीं. संद्याकडं आला. आजुबाजूला कुणी नाहींसं बघून त्याला म्हणाला,

"संद्या, पाटलाच्या पोराला वहीम आला का रं आपला ? खोंडाला ईख चारतांना त्यानं बघटल का ?"

"न्हाई, मी मध्यानरातचा गेलो हुतो. त्यानं बघटलं न्हाई मला !"

"गड्या, हें काम वाईट झालं आपल्या हातानं ! पाटील लई कळवळला. आन् केल्यासारखं काय मिळालं बि न्हाई. मुखात घास गेला न्हाई !"

संद्या कांहींच बोलला नाही. काहीं वेळ इटुबाहि गप्प राहिला. आणि मग एकाएकीं घाईला येऊन बोलला,

"बरं, मग मुलान्याच्या कोंबड्याकडे कवा बघायच ?"

# वहाणा

सकाळच्या प्रहरीं पाडा घराबाहेर पडला आणि व्हरलवाड्याच्या दिशेनं चालू लागला.

अंगाचं वेटोळ करून उकिरड्यात पडलेलं त्याचं कुत्रं उठलं. जबडा वासून पाय तणावून त्यानं आळस दिला. आणि पाडाची पाठ घेतली. सदा भुकेनं हाडाडलेलं, चोपलेलं हें लाबोडकं जनावर पाडान पाळलं होतं. कुत्रं पाळण्याची त्याची ऐपत नव्हती! त्याला दिवसाच्या दोन भाकरी कुणी घालाव्या? पण या जनावराचा आणि पांडाचा पूर्वजन्मींचा लागाबांधाच. तें बिचारं एरवीं पाडाच्या घरीं असे, रानामाळात सोबतीला असे, आणि भुकेच्या वेळीं मात्र दुसऱ्याच्या दारांत जाऊन उभं राही. मिळेल तो ताकडा तुकडा खाऊन भूक भागवी. आपल्या पोटाच्या बाबतींत त्यानं धन्याला कधींच तोशीस दिली नाहीं.

हातांत तुटक्या वहाणा घेऊन पाडा व्हरलवाड्यात शिरला आणि गोपा व्हरलाच्या खोपटाशीं आला. गोपा अद्याप कामाला लागला नव्हता. तुटक्या जोड्यांचा ढीग, आरी, टोच्या हा त्याचा सरंजाम अद्याप बाहेर मांडलेला नव्हता.

मेढीशीं लागून पांडा उभा राहिला आणि हलक्या आवाजात त्यानं हाळी मारली, "गोपानाना, हो गोपानाना!"

पोटाच्या भकाळ्या गेलेलं पाडाचं कुत्रं धुळींत टेंकलं; कानाच्या कोक्यांत शिरलेल्या गोमाशा झाडू लागलं.

हातांतील वहाणा एकमेकावर घाशीत पाडा व्हरल बाहेर येण्याची वाट बघूं लागला.

थंडीचे दिवस. गांवावर धुकं पसरलं होतं. कानाचे चोबे आणि नाकाचे शेंडे गारठून दुखत होते.

घोगड्याची खोळ मारून गोपा माळीच्या बुटक्या दारातून बाहेर आला. तोंडावरचं घोगडं बाजूला न करताच त्यानं डोळे उडवले.

तोंडांतून आवाज आला नाहीं तरी डोळ्याची बोली पाडाला समजली. तो उत्तरला.

" अशासाटीं आलो होतों गोपानाना, वहाणा पार तुटल्यात. त्याच्याकड बघा थोडकं ! "

आणि हातातील वहाणा त्यानं गोपापुढ टाकल्या ! मग मात्र गोपाला बोलणं भाग पडलं. तोंडावरचा बुरखा काढून तो टक लावून वहाणाकडे बघूं लागला आणि मग कसनुस तोंड उघडून बोलला,

" ह ! कशाला आणलं जी हें ? "

त्याच्या स्वरातील बारकावा पाडाला उमगला आणि तो हिरमुसला.

हातातील चुरा झालेल्या वहाणा खालीं टाकून गोपानं मान हलवली.

" ह्या ! काहीं उपयोग होणार नाहीं ! "

पाडा आजीजीच्या स्वरांत बोलला,

" तस नका. हिंडावं लागत गुरामाग रानामाळातन. काटं लागतात. बघा, चार टाकं घाला. "

गोपाचा आवाज चढला. वहाणा उचलून कुत्र्याच्या दिशेनं उडवीत तो म्हणाला,

" कुत्र्यापुढं टाकून बघा, तेसुद्धा तोंड लावणार नाहीं ! "

वहाणा पुढ्यांत येऊन पडल्या तसं पाडाचं हडकुळं कुत्र लटकन् हललं. आल्हाद उडी मारून पलीकडे पळून गेलं. लाब उभ राहून व्हरलाकडे बघूं लागलं.

पाडा पुढं झाला आणि धुळींत पडलेल्या वहाणा उचलून घेत म्हणाला,

" तसं नका. बघा चार टाकं घालून. आज खोळंबा आहे. पाटलाचीं गुरं सोडायला जायाचं आहे. उशीर झाला. "

" अरिबा, बरी चिमट लावलीय कीं ! चुरा झालाय पार. त्याला टाकं घालून काय करूं म्हणता ? "

गरजू आणि गरीब पांडा खजील झाला होता आणि उर्मट गोपा व्हरल त्याला जास्तच बोंचीत होता.

" दुरुस्त होणार नाहीं तें माझ्या हातनं. " असं शेवटचं सागून तो पुन्हा माळींत शिरूं लागला. तेव्हा पांडा फार घायकुतीला आला.

" गोपानाना, तस करू नका. माझ्या पायाची चाळण झालीया काट्यानं. त्यात भर नको. जरा तळवा झाकल अस करून द्या. "

आणि पुन्हा त्यानं त्या चुरा झालेल्या वहाणा व्हरलापुढं टाकल्या.

गोपा मेढीला टेंकून बसला आणि बेतानं म्हणाला,

" आता नवी वहाण घ्या देवा. अस किती दिवस निभणार ?"

फाटून चिध्या झालेल्या मुडाश्याशीं चाळा करत पाडा बोलला,

" पैका कुठला द्यावा गोपा ? "

" पाटलाची गुरं राखोळीला नेतां; पाटील पैका देत नाहीं का ?"

" काय होणार त्यात गोपा ? पाटील महिन्याचा दीड रुपया देतो. तो मीठमिरचीला जातो. त्यांतून सवड कशी काढायची आणि पायीं पायताण कसं घालायचं ? "

" अहो, महिन्याला दोन दोन आणे माग टाकत आला असता तर नवी वहाण घेण्याजोगा पैका झाला असता !"

" खरी गोष्ट ! पण तस केलं नाहीं. इथून पुढं करीन. पण तोवर पायांत काय ? "

व्हरलानं या प्रश्नाच उत्तर दिल नाहीं. तो आत गेला आणि नवा बाधलेला एक सुरेख वहाणजोड घेऊन बाहेर आला. तो पाडापुढ ठेवून बोलला, " बघा, अडाणी गोपाच कसब !" खरोखरी गोपान वहाणा नमुन्यातील बाधल्या होत्या. जाड. वर सुरेखपैकीं रिंग मारली होती. पितळेची, बारीक आणि चकाकणारी. पालथ्या हातान नाक पुशीत पाडा म्हणाला,

" हा, झ्याक !"

त्याच्या स्वरात फार मऊपणा होता. पण गोपाला तो पुरला. उत्तेजित स्वरात तो म्हणाला,

"तसं काय समजणार ? पायात घालून बघा पांडोबा !" आणि अंगावरच्या धोतरानं पुसून त्यानं वहाणा पांडाच्या पायापाशीं ठेवल्या.

काकुळतीला येऊन पांडा म्हणाला,

"उगीच कां गोपा ? देणं नाहीं घेणं नाहीं. बोलून काय बरं उपयोग ?"

पण गोपा गप्प राहिला नाहीं. तो पांडाच्या पायाशीं आला आणि वहाणा पुढं सारून त्यान त्याचा एक पाय आपल्या काळ्या आणि कठीण हातांनीं बळकट धरला.

"हं उचला."

पांडा फारच ओशाळला,

"नाहीं पण, उगीच कां–"

"अरेबा ! घालून बघायला काय पैका पडतोय का ?"

"नाहीं. पण देणं नाहीं घेण नाहीं. फुकट का ?"

पण म्हरलानं बळ करून पांडाचा पाय उचललाच. त्याला वहाणा घालायला लावल्याच.

"हा, बघा कशा फिट बसतात तुमच्या पायाला आणि दिसतात कशा शोभून !"

पांडा लाजला. त्याचा वेडाभाबडा चेहरा लाजेनं कसनुसा झाला आणि मग चटकन् त्यानं पायातल्या वहाणा काढून ठेवल्या.

गोपा म्हणाला,

"आहे का नाहीं फैनाबाज काम ?"

धुळींत पडलेल्या आपल्या फाटक्या वहाणा उचलून पांडा चावत बोलला,

"हां. पण ह्याकडं बघा कीं थोडक. तळवं झाकतील असं कांहीं—"

नव्या वहाणाची जोडी एकमेकावर आपटीत गोपा बोलत होता,

"दाम म्हणाल तर जास्ती नाहीं, पांडोबा. फकस्त रुपये साडे चार. काय ? रुपये चार आणि आणे आठ !"

सूर्य बराच वर आला होता. कोंवळीं उन्हं गोपाच्या डोळ्यावर येऊन ते

मिचमिचत होते. गुरं सोडायची वेळ झाली होती आणि पांडाला व्हरलानं उगीच घोळांत धरला होता.

"बरं मग. गोपानाना, ह्याकडं बघा कीं."

"पांडोबा, तुम्हाला वाटल रुपये जातात. पण हें पायताण तुम्ही दोन वर्ष बिनघोरी ओढा; त्याला धाड होणार नाहीं!"

पांडानं आपली फाटकीं पायताणं हातांत नीट धरली आणि मग त्यानं शेवटचं विचारलं,

"मग, हें होणार नाहीं गोपा?"

"नाहीं देवा, त्यात आता काहीं राहिलं नाहीं. कुत्र्यानं खाल्लं तरी चार दिस त्याच्या पोटात दुखेल!" आणि व्हरल मोटमोठ्यानं हंसला. इतका हंसला कीं त्याच्या डोळ्याला पाणी आलं.

खाली मान घालून पांडा व्हरलवाड्याच्या बाहेर पडला आणि पाटलाच्या वाड्याकडे आला. त्याच तांबड्या रंगाचं मरतमढ कुत्रं त्याच्या मागोमाग होतंच! पाटील चिलिम ओढत जोत्यावर बसला होता. पांडाला बघताच तो बोलला,

"का रं, एवढा वेळ? कुठं गुतला होतास?"

पांडा कसं तरी हंसला आणि आपल्याशींच बोलल्यासारखा उत्तरला,

"कुठं नाहीं, आपला गोपाकडं—व्हरलवाड्यांत गेलो होतो!"

"आं?"

"काहीं नाहीं, झाला खरा थोडका उशीर."

यापैकीं एकहि शब्द पाटलाला स्पष्ट ऐकूं आला नाहीं.

चिलिम झाडून, पुन्हा खडा नीट बसवीत पाटील ठिसकला,

"बरं, जा आता तरी जलदीनं. दिवस डोक्यावर आला!"

"हा, निघालोच."

पण पांडा निघाला नाहीं. जागच्या जागीं घुटमळतच राहिला. पाटलानं विचारलं,

"कां रे?"

" काहीं नाहीं ! "

" मग घुटमळतोस कशापायीं ? "

" काहीं नाहीं. निघालोच नव्हं का ! "

तरीहि पाडाचा पाय निघेना. तेव्हा पाटलान हेरलं आणि विचारलं,

" काय तरी बोलायचं मनात आहे तुझ्या. बोल, बोल. "

पाडा लाचारीन हसला. हातातल्या फाटक्या वहाणा घट्ट आवळून म्हणाला,

" मेहरबानी कराल का पाटील ? "

" आ ? "

" नाहीं म्हणू नका. माझ्या पायाला कुरुप झालेत काट मोडून. रानामाळांत हिंडायच म्हनल्यावर पायात पाहिजे ! '

हे नमन कशासाटीं चालल आहे हें पाटलाला उमगेना. दोन्ही हात गुडघ्यावर ठेवून तो पुन्हा पुन्हा विचारू लागला,

" आं ? काय म्हणालास ? "

" व्हरलाकड जाऊन आलो. तो बोलला, ह्या वहाणा दुरुस्त होणार नाहींत. मग ? "

" गड्या, मला तुझ बोलण कळेना ! जरा जोरान बोल. जेवला होतास का काल ? आ ? "

पाडाच हाडाडलेलं कुत्र पाटलाच्या दावणीशीं गेल होत आणि ल्हान वासराचं कोवळ शेण मोठ्या चवीनं खात होत. खाताना त्याचे कान सारखे खालवर होत होते आणि शेपूट दोन्ही पायात पोटाकडे जात होतं.

मग पाडान धीर केला आणि नेट धरून तो बोलला, " मला साडेचार रुपये द्या पाटील. नड आहे ! "

हे बोलणं मात्र पाटलाला ऐकू गेल.

" रुपये ? कशाला रे ? "

" नड आहे. "

" कसली ? "

" पायात काहीं नाहीं. नवी वहाण घ्यावी म्हणतों ! " आणि हातातल्या वहाणा धीर करून त्यान पाटलाला दाखविल्या.

पण निर्विकारपणं पाटील म्हणाला,

" रुपये कुठलं आणूं पाडा? दातावर हाणीन म्हटलं तर पैसा नाहीं माझ्यापाशीं ! "

" तसं करू नका. मी उसन मागत नाहीं. माझी दोन महिन्याची राखोळीच द्या. आगाऊ मागतोय् एवढच ! "

" ते खरं रे, पण रुपये आणू कुटनं? पुढच्या बाजागला घेऊन जा ! "

" तस नका करू. आज महिना झाला, अनवाणी हिंडतोय मी. तस नका करूं. हे बघा, पाया पडतो, पण माझं एवढं ऐका ! "

पाडा फार कायकुतीला आला, वरचेवर पाया पडू लागला, तेव्हा पाटलाला कणव आली. पण ती चेहऱ्यावर न दाखवता तो उटला आणि रुपये पांडापुढं फेकून रागान बोलला,

" हं, चल नीघ. वसुलातलं रुपये आहेत हे सरकारी. "

पाडा पुन्हा पाया पडला आणि म्हणाला,

" मेहरबानी आहे मालक ! "

मग तडकाफडकीं त्यान गुरं मोडली. तीं रानात लावली आणि छाती काढून तो व्हरलाकडे आला. बाहेर उभा राहूनच म्हणाला,

" ये व्हरला, बाहेर ये. "

गोपा व्हरल भाकरी खात आत बसला होता तो तोंडात घास ठेवूनच बाहेर आला. पाडाचा हुकमी आवाज ऐकून त्याला मोट नवल वाटल.

तो बाहेर येताच पाडान कनवटीचे रुपये काढले आणि टणकन् ते व्हरलाकड फेकून तो टेशींत म्हणाला,

" हे रुपये घे आणि वहाणा दे ! "

व्हरलानं घास गटकन् गिळला आणि छातीवर हात चोळीत तो रुपयांकडे, पांडाकडे आश्चर्यान बघू लागला.

दरम्यान पांडाचं कुत्रं धन्याच्या पायाशीं येऊन उभं राहिलं होतं. तें कान उभारून व्हरलावर भुकूं लागलं.

पांडा अरेरावीनं म्हणाला,

" हां, आटप. मला वेळ होतोय्. रुपये वाजवून घे आणि वहाणा दे त्या ! "

आणि हातांतल्या फाटक्या वहाणा त्यानं गोपाच्या उकिरड्यावर भिरकावून दिल्या.

गोपा मुकाट्यानं खाली वांकला. रुपये वेंचून आत गेला आणि वहाणजोड पांडापुढं टाकून म्हणाला,

" भले पांडोबा, अशी पाहिजे जिद्द ! "

बेफिकीरपणें पांडानं वहाणा पायांत सरकावल्या. व्हरलाशीं एक शब्दहि न बोलता तो झ्याकींत चालूं लागला. शेपूट हालवीत त्याचं कुत्रं त्याच्या मागोमाग गेलं !

निळ्या आभाळाखालीं पसरलेल्या हिरव्यागार रानातून गुरं चारीत पांडा त्या दिवशीं सुखानं फिरला. बाभळीच्या फाजरावर त्यानं मुद्दाम पाय दिले. काटेरी कुंपण ओलांडली. सराट्याचे वेल पायाखालीं रगडले ! बरोबरीच्या गुराख्यानीं पांडाच्या नव्या वहाणा बघितल्या. आणि एकच गिल्ला केला. नव्या वहाणा पायांत घातल्या म्हणून सगळ्यानीं त्याच्या पाठींत धबाके घातले. हा आनंदाचा दिवस त्यानीं साजरा केला. कसा केला ? गुरं रानांत लावून चोऱ्यामाऱ्या केल्या. दुसऱ्याच्या रानातून काकड्या चोरून आणल्या. एकत्र बसून खाल्ल्या. वर्गणी करून वाण्याघरची तंबाकू आणली आणि रुईच्या पानाची चिलिम करून ओढली. पोरानीं नुसता हैदोस घातला.

दिवस मावळायच्या सुमारास गुरं बांधून पांडा घराकडे आला. पटका काढून भाकरी खायला बसला. त्याच्या म्हातारीनं एक भाकरी आणि तिखट वांगं त्याच्या हातीं दिलं. पाण्याच्या तांब्यावर भाकरी मोडून ठेवून पांडा घास घेऊं लागला तेव्हां त्याचं मरतुकडं कुत्रं उंबऱ्यांत उभं राहून जीभ चाटूं लागलं, विव्हळूं लागलं.

पांडा म्हातारीला म्हणाला,

"भाकरी असली तर टाक ग ह्याला !"

तशी म्हातारी उसळली. लाकडाचा कांडका कुत्र्याच्या पाटींत हाणून म्हणाली,

"अरे, माणसाना मिळेना आणि ह्याला कुठली घालतोस भाकरी ? मरूं दे कीं तिकडं !"

पाटींत लाकूड बसताच कुत्र उलथंपालथं झालं आणि न केंकाटतांच धूम पळालं !

पाडा तेल्याच्या घाण्यावर गेला आणि तेल्याकडून त्यानं तेलाचा गाळ मागून घेतला नि घरीं येऊन नव्या वहाणाना दिला. भितीला लागून त्या उभ्या ठेवून दिल्या आणि मग रात्रीं तो सुखानं आडवा झाला.

पहांट झाली. म्हातारी कण्या भरडूं लागली. जात्याच्या टरटराटानं पांडा जागा झाला आणि ताब्या–धोतर घेऊन विहिरीकडे निघाला. घरात अजून पक्का उजेड नव्हता. भिंतीशीं चाचपून पाडानं वहाणा शोधल्या तों एकच वहाण हातीं लागली. दुसरी सांपडेना. कवाड खोललं तेव्हां थोडा अधिक उजेड आत आला. भिंतीशीं एकच वहाण होती. दुसरी कुठं गेली ?

पांडा म्हातारीवर ओरडला,

"माझी वहाण कुठाय ?"

जात्याच्या टरटराटात म्हातारीला ऐकूं गेलं नाहीं. तेव्हा तिला हलवून त्यानं पुन्हा विचारलं,

"ये, माझी दुसरी वहाण कुठाय ?"

जातं थांबवून म्हातारीनं गळ्याचा घाम पुसला आणि विचारलं,

"काय रं ?"

"माझी एक वहाण घावंना, तूं बघितलीस का ?"

"नाहीं बा !"

दिवा लावून पांडानं सगळं घर धुंडाळलं. वहाण सांपडली नाहीं !

तो चिडला,

" ब्राईली, चोरट्यानं नेली म्हणावं तर एकच वहाण कशी नेली ? "

आणि मग एकाएकीं त्याच्या डोक्यात उजेड पडला. झटक्यासरशीं बाहेर येऊन तो उकिरड्यापाशीं गेला.

नव्या वहाणेचा भुगा तिथ पडला होता आणि भुकेल्या पोटीं कातडं घालून टम फुगलेल तावडं कुत्रं पाय तणावून निवात झोपल होतं !

# आ डि ट

गोपा व्हरल आपल्या खोपटापुढं उघडा बसला होता. अंगातल मळकं अंगरखं त्यानं उलटं करून उन्हाला टाकल होत आणि आपल्या बारीक नजरेन तो त्याच्या शिवणी न्याहाळीत होता.

गोपा रंगानं करवंदासारखा काळा होता. त्याचं नाक नकटं होत, गालाचीं हाडं वर आली होती. डोळे बारीक आणि मिचमिचे होते. उन्हानं तापलेली पाठ तो उफराट्या हातानं ओचकारी तेव्हां त्याच्या काळ्याभोर पाठीवर पांढरेधोट ओरखाडे उठत.

इतर व्हरलाप्रमाण गोपाहि दरिद्री होता. कातडी कोरून त्यावर त्याचं पोट भरत नव्हतं. कुणीं पानाचा विडा खायला दिला तर ती त्याला अपूर्वाई वाटे. उशीरपर्यंत विडा तोंडात घोळवत ठेवून तो त्याची मजा घेई. तहान लागली तर तोंडांतला चोथा काढून दगडावर ठेवी. पाणी पिऊन झाल्यावर तो पुन्हा तोंडात टाकी. असा गरीब गोपा अलीकडे थोडा गबर झाला होता. दहा-पांच रुपयाना विकत घेतलेली त्याची पाट मोठी झाली होती. व्याली होती. दोन सुरेख बोकडं तिन मालकाला दिली होतीं. कळणाकोंडा घालून गोपानं त्यांचा साभाळ नीट केल्यामुळ तीं आता चागली टणटणीत झाली होतीं. त्या जोरावर गोपा तालेवाराच्या तोऱ्यान वागत होता. मान ताठ ठेवून गावातून हिंडत होता. तमाखू खात होता आणि विड्या ओढत होता.

उन्हाला बसून गोपा अंगरख्याच्या शिवणी न्याहाळीत होता. दडलेल्या उवा शोधून मारत होता. आणि पलीकडे खोपटाच्या मेढीला बाधलेली त्याचीं दोन बोकडं तोडानं कांहींतरी चघळीत होतीं. त्यापैकीं एक करड्या रगाचं होतं आणि दुसरं धन्यासारखं काळं असून त्याच्या कपाळावर दिवा होता. त्याच्या आखुड

शेपट्या सारख्या हाल्त होत्या. आपल्या गुबगुबीत हनुवट्यांना झोले देत तीं दोघंहि काहींतरी चघळत होतीं. आणि त्याची केसाळ आई कासेचा झोळ पुढं काढून निवात बसली होती.

अशा वेळीं गणा चलपते व्हरलवाड्यांत शिरला आणि गोपाच्या खोपटापुढं येऊन उभा राहिला.

डोळे मिचमिचे करून गोपा त्याच्याकडे बघूं लागला. तांड उघडं टाकून बघूं लागला.

मग गणा म्हणाला, "काय चाललंया, गोपा?"

पायांच्या पजावर दोन्ही हात ठेवून खाली बघत गोपान उत्तर दिलं, "काय न्हाई. बसलुया उगीच!" आणि पुन्हा तो शिवणी बघूं लागला.

चलपत्याचा थोडा अपमान झाला. त्याच्यासारखा माणूस घरीं येऊन गोपा जागचा उठला नाहीं का त्यानं रामराम केला नाहीं ही गोष्ट त्याला बोंचली. दोन बोकड बाळगून असल्यामुळ व्हरल माजला आहे याची जाणीव त्याला झाली.

उभ्या राहिल्या-राहिल्याच, मेढीशीं बाधलेली तुकतुकीत बोकड न्याहळून गणान विचारलं, "बोकड देणार का, गोपा?"

"आ?"

"बोकड देतोस का? माझ्या घरीं पावणे येणार आहेत. त्याना जेवण करण्यासाठीं मला एक बोकड पाहिजे!"

गिऱ्हाईक आपणहून घरीं आल्यामुळ गोपा ताठला. म्हणाला, "तुमाला दाम परवडणार न्हाई!"

गणा बोकडापाशीं गेला. त्याची कबर चाचपीत म्हणाला, "अरे, साग तर किती तो. काय शंभरभर सांगणार आहेस न परवडायला?"

पेकट चाचपल्यामुळ बोकड लटकन् हाललं आणि उलट फिरलं. पवित्र्यांत उभं राहून अंगणांत उभ्या राहिलेल्या चलपत्याकडे बघूं लागलं. इतका वेळ कांहीं चघळणारा त्याचा जबडा थांबला.

गोपा म्हणाला, "सागून फायदा व्हनार न्हाई, चलपते. तुमाला दाम परवडनार न्हाई!"



चलपते रागाला आला. आडमुठ्या व्हरलाचं हें बोलणं ऐकून संतापला. बोकडाची किंमत न परवडायला गणा कोण लुंगासुंगा माणूस होता का? गोपा व्हरलाचं सगळं खोपट बोकडासह विकत घेण्याची ताकत त्याच्यापाशीं होती.

मेढीशीं बांधलेला गुबगुबीत बोकड दोरीशीं ओढ घेऊन उभा होता.

चलपत्याकडे बघून तोंड असं करीत होता की जणूं तो वेडावण दाखवतो आहे.

गोपा खालीं बघून छातीवरचे केस उपटीत होता. त्याचं काळेभोर आणि बोक्यासारखं पोर भाकरीचा तुकडा खात बाहेर आलं आणि बसलेल्या शेळीचीं थानं ओढूं लागलं. चलपत्याला काय बोलावं तें सुचेना. उभं राहून पाय दुखूं लागले तेव्हा खाली पडलेल्या लाकडाच्या ओडक्यावर तो बसला आणि म्हणाला,

"मग काय, गोपा ?"

दोन्ही पायामध्यें थुंकून गोपा बोलला, "कशाचं ?"

"दाम सांग कीं बोकडाचा !"

"सांगूं ?"

"हां !"

"एक घेनार का दोन्ही ?"

"एकच. दोन घेऊन मला काय गावजेवन घालायचं हाय का ?"

"दोन घ्याल तर मला बरं पडंल. निदान मूटभर पैका तरी हातात पडंल !"

"नाहीं. मला एकच पायजे !"

"बरं, बोकड पसंत हाय का ?"

"त्याशिवाय तुला मागतोय का ?"

शेळीनं लाथ झाडली तेव्हां गोपाचं पोरगं उताणं पडलं. न रडता उठलं आणि बापाला चिकटून चलपत्याकडे बघूं लागलं. बोबड्या बोलीत शिव्या देऊं लागलं.

त्याला काहीं न बोलता गोपा कौतुकानें हंसला. तें हंसणं चलपत्याला गोफणीच्या धोंड्यासारखं लागलं.

करड्या रंगाचा बोकड एकाएकी ओरडला. मग्रूर आणि मस्तीला आलेल्या पोरासारखा ओरडला, "बॉआ–"

चलपते म्हणाला, "हां, आवर. बोल, काय घेणार ?"

व्हरल मग्रुरीनं बोलला, "रुपयं तीस बसतील एका बोकडाचं !"

" गाजा ओढून बोलतोस काय, लेका? काय भाव बघशील का तोंडाला आल ते बोलशील?"

" बरं तुमी काय देनार?"

" रुपये वीस मिळतील!"

यावर गोपा बोचर हसला. म्हणाला " मग रेडा कापून खा की एखादा. बोकडाची चव कशाला तुमाला?"

त्यासरशी चलपते सटक्यान जागचा उठला. भडकून म्हणाला, " काय र, ये भडव्या, कुणाला बोलतोस हे? आ, कुणाला?"

त्याचा चेहेरा लालभडक झाला. ओठ थरथरू लागले.

" रेडा खा म्हणतोस. गावात रहाणार नाहीस तू! देशोधडीला लावीन तुला! या गणाला तू कोण समजतोस?"

पण व्हरल जागचा न हालता उत्तरला, " अव, त्रास आला दम! असल्या दमाला भेत नसतो मी!"

" गोप्या, गोप्या. सभाळून बोल!"

" त्रास, त्रास! अरं तुर करायच काम न्हाई. शिव्या देन्याचं काम न्हाई. मी तुमाकड आलो न्हाई. तुमी आला माझ्याकड बोकड मागायला. परवडत नसल तर गप जा घराकड!"

हा गोंधळ एकून इतर खोपटातले व्हरल गोळा आले. पटकुरं नेसलेल्या बाया झिज्या सावरून खोपटाबाहेर आल्या. त्याबरोबर गोपाला जास्तीच आवेश आला. अंगरखा गोळा करून तो उठला आणि चलपत्यासमोर तो उडवीत म्हणाला, " ममईला दावावी असली अक्कड! इथ कोन भेनार न्हाई!" या बोलण्यासरशी आजुबाजूला उभे राहिलेले व्हरल हसले. गावात रहाणाऱ्या एका पोषाखी माणसाला व्हरलवाड्यातला एक गडी टणाणून बोलतोय् हें बघून त्याना बर वाटलं!

मग चलपते जास्ती बोलला नाहीं. तावातावान गावात आला आणि थेट पाटलाच्या वाड्यात गेला.

छपरी मिशाचे केंस पिळीत पाटील जोत्यावर बसला होता. त्याला काहीं

उद्योग नव्हता. शर्टाचा मागला पखा पुढं घेऊन चलपते त्याच्या शेजारीं बसला. वहाणा काढून पाय वर घेत बोलला, " आज गाव बोलवा चावडीपाशीं ! "

टरटरीत आवाजात पाटलान विचारल, " का र गणा, काय भानगड ? "

" तुमची–माझी जात कोणची ? "

" अल्बत्, मऱ्हाठ्याची ! "

" गोप्या ऱ्हरलान आपल्याला महार केल ! "

" आ ? "

" हा ! त्याच्या हिशेबी आपण रेड खाणार हाय ! "

" अस म्हणाल ते ऱ्हरल ? "

" हा-हा. मी बोकड इकत घेन्यापाशीं गेलों तर तो म्हणाल्या, 'बोकडाऐवजीं रेडं कापून खा !' "

" बाईली, ऱ्हरल माजल मग ! "

" माजल? अहो, त्याला तमा गहिली नाहीं आपली. उफराट बोलल मला धा माणसादेखत ! "

" मग माजच चावडीपुढ बोलवून घेतां त्याला. लाथलतो उमटाला ! "

मग पाटलानं तराळाला बोलवून सांगितल, " जा र. मडळीना म्हणावं चावडीकड बोलवलंया माजला ! "

" जी ! कुनाकुनाला सागू ? "

" तुला टाव नाहीं का, लेका, कारभारी मडळी बोल्वायची ! "

" तरी पर— "

" आबानाना, खडू कुरकळणी, बडा न्हावी, नाना बामण, जी जी मंडळी फुडाकार घणारी ती बोलाव. जा ! "

तराळ गेला आणि पाटलाचा निरोप त्यान सगळ्यांना पोंचता केला.

जेवणखाण आटपून गावांतील शेलकी मडळी चावडीपुढ आली. घोंगड्याच्या खोळी मारून पायऱ्यावर, जोत्यावर बसली. कुणीं विड्या पेटवल्या, कुणीं चिलमी शिलगावल्या.

अंधारांत एकमेकांचे चेहरे नीट दिसत नव्हते. बोलण्याचालण्यावरून कोण कोण आहे हे एकमेकाना कळत होत. कुणी नवा गडी आला कीं त्याचीं पायताणं वाजत. खाकरत-खोकरत तो येई आणि मग कुणीतरी विचारी, " कोण हाय ? "

नवा गडी आवाजावरून विचारणारास ओळखी आणि म्हणे, " का हो नाना, मी भाना हाय ! "

" हा हा, बैस ! "

बरीच मंडळी जमली तेव्हा नानांनी विचारलं, " काय पाटील, कशासाठीं बोलावली मंडळी ? "

पाटील खाकरला. बोलला, " अर, गोप्या म्हार आला का ? "

समोर भिंतीकडेला लागून म्हार मंडळी बसली होती. तिकडून उत्तर आलं, " हा, आलाय जी ! "

" आन् गणा चलपते ? "

पाटलाच्यामागूनच आवाज आला, " मी मागंच हाय की हो पाटील, तुमच्या ! "

" हाईस् ? अर, मला काय अंधारात दिसलं न्हाई ! "

मग मंडळी एकमेकात कुजबुजू लागली. ' गणा चलपत्यानं गोपावर आडीट आणलं असावं ! '

तो गलगा शांत करून पाटील चलपत्याला म्हणाला, " आवर, गणा, तुझी तक्रार सांग ! "

" तुम्हाला सांगितलीच कीं. माझ्याच तोंडातनं पुन्हा यावं असं हाय काय ? "

" हा, तसंच हाय. बोल ! "

जरा वेळ गणा गप्प बसला आणि मग बोलला, " मंडळी, गोप्यानं आपल्याला महार जातींत धरलं ! "

खड्डू कुलकर्ण्यानं मधेच प्रश्न केला, " आपल्याला म्हणजे कुणाला, गणा ? "

"म्हणजे आम्हा मऱ्हाटे मंडळींना हो !"

"मग अस म्हण ! मोघम आपल्याला म्हणाल्यावर त्यांत सगळी आली. मी आलों, मोमिन आला. आ ?"

चलपत्यान चुकीची दुरुस्ती केली आणि म्हारलवाड्यात घडलेली सगळी हकीकत सागून तो म्हणाला. "मला म्हणाला त्याअर्थी त माझ्या सगळ्या जातीला म्हणाला. तेव्हा गावान या गोष्टीचा न्याय करावा !"

म्हरलाला शिव्या दिलेल्या ऐकू आल्या. गजबज झाली. म्हरलहि काही मोठ-मोठ्यान बोलू लागले. तेव्हा नानानीं त्या सर्वांस गप्प करून प्रश्न टाकला, "अस एकतर्फी का ? गोप्यालाहि सागू द्या त्याच म्हणण."

"का र, गोप्या ?"

"जी !"

"तू चलपत्याला अस बोललास का ?"

प्रश्न सगळ्या गावाचा झाल्यामुळ गोपा दबकला होता. त्याचा आवाज खाली आला होता. तो म्हणाला, "माजीं बोकडं तरी बघा तुमी, पाटील. तसल्या मालाला ईस रुपय दाम ?"

चलपते ओरडला, "नाही, शभर रुपय द्यावत एकाएकाला ! अर, जगात काय बोकडं नाहीत का ? पर तुझा दाम विलायती ! काय. लेका, तुलाहि दोन बोकडान राज मिळाल्यू ! म्हण हाय, 'मुगीला मुताचा पूर !'"

गोपा बेतान बोलला, "व्हय जी, आमा गरीबाम्नी मुताचाच पूर ! तुमा-वाणी ममईला जाऊन दर्याची हवा कदी बघितलीया आमीं ?"

तेव्हा पाटील ओरडला, "वाकड बोलूं नकोस, गोप्या !"

"न्हायल जी ! वाकडं बोलण्याची परवानगी तुमालाच. आमी गरिबानी सरळच बोललं पायजे !"

या बोलण्यानं तर पाटील अधिक चिडला आणि मग त्याची आणि गोपाचीच झकाझकी सुरू झाली. चलपते वेगळा राहिला. मंडळी गप्प बसली. आणि पाटलाची-गोपाची लठालठी लागली.

"तुला एवढा माज कशान आलाय र व्हरल्या, आं?"

"माझ्यापशीं काय हाय जी माज येण्यासारखं? चार पैसं हायेत, का मी कोन सरकारी अम्मलदार हाय, का जमिनजुमला हाय मला? तुमच्या उष्ट्यावर जगनारा मी!"

"असलं तिरप बोलणं कळत मला. नीट बोल नाहीं तर भुडीवर उभा करीन!"

"करा! गावच राज हाय तुमी. तुमची मर्जी असल तस करा!"

"पुन्हा वाकडंच! रेड कापून खा म्हणतोस आमाला? आमी म्हार अन तू शाण्णवकुळीचा मऱ्हाटा, व्हय र?"

"कशाला मला ती पदवी, पाटील? हाय ही जात बरी हाय माजी!"

मग मात्र मंडळी चिडली. गोप्या व्हरल जेव्हा वाकड्यातच शिरू लागला, प्रश्नांची नीट उत्तर देण्याऐवजी खवचट बोलू लागला, तेव्हा मऱ्हाटे मंडळी फार तापली.

नाना ओरडले, "बाईली, हाणा की र नाकाडावर चार काटया ह्या बेट्याच्या. मघाधरन ऐकून घेताय्, नीट बोलंच ना!"

बंडा न्हावी गरजला, "गोप्या, नशापानी करून आला असलास तर एका बुक्कीत उतरवतो ती मी. गावाच्या इरुद्ध जातोस? जीव नग झालाय का तुला?"

भाना उठून उभा राहिला. त्याचं तरण रक्त या अपमानानं फार तापलं. आपल्याला महार म्हणावं म्हणजे काय गोष्ट आहे? तो बंडाला म्हणाला, "बोलून भाग नाहीं, बंडाप्पा, या मान्याला ठेचला पाहिजे!" आणि हातातलं आखुड दाडक त्यानं अदमासानं भिरकावलं. दोन पायावर बसलेल्या हऱ्याला ते नडगीवर लागलं आणि तो कोकलला, "अर देवा-देवा, मेलो! मला का र पाटील? मी हऱ्या हाय, मी काय केल्या?"

भाना ओरडला, "अर, तू कोण त्येचाच भाऊबंद. सगळेच माजलाय तुमी. तुमचीं खोपटं जाळली पायजेत. लाथा घालून गाव सोडायला लावलं पायजे तुमाला!" मग गणाहि उभा राहिला आणि त्यानं सगळ्याना स्फुरण दिलं, "व्हरलं माजलींत! जो कुणी मऱ्हाट्याच्या पोटचा असल त्यानं व्हरलांना धडा द्यावा!"

हें आव्हान सर्वांनीं स्वीकारलं. अंधारातच मंडळी धडाधड उठली आणि भिंतीशीं बसलेल्या मूटभर व्हरलांशीं भिडली. आकस्मिक हल्ल्यान गोंधळलेलीं व्हरलं जागचीं उठतात न उठतात तोवर त्याच्यावर वहाणा आल्या. फडाफड जोडे बसूं लागले. पाठींत, डोक्यात, तोंडावर. गावकरी पिसाळले. धर व्हरल, उचल कमरेइतकं आणि आपट खाली, घाल लाथा, बुक्क्या, असा धोशा त्यांनीं चालवला. व्हरलं कळवळून ओरडूं लागली, रडूं लागली, तोंडावर हात घेऊं लागली. पण कुणाला त्याची कणव आली नाहीं. तरण्या पोराची तालमींत कमाविलेली ताकत उफाळून आली. त्याखाली व्हरलाची हाडंनूहाड खिळखिळीं झाली. व्हरलं रक्तबंबाळ झाली. आणि आरडत-ओरडत व्हरलं वाड्याकडे पळालीं. कुणी गावकऱ्याचे पाय धरले. कुणी जागच्या जागीं विव्हळत पडले. असा सगळा प्रकार घडला. त्यातच रात्र निघून गेली.

सकाळच्या प्रहरीं गोपा लंगडत, विव्हळत गांवात आला. त्यानं हातात धरलेल्या दोरीशीं बोकड ओढ घेत होत. रात्रीच्या मारान गोपा जागोजाग दुखावला होता. त्याचा उजवा हात मोडला होता. कपाळ फुटल होत. रात्रीं सडकून भरलेल्या तापान चेहरा मलूल झाला होता. डोळे ओढले होते. नाबडे झाले होते.

बोकडाला ओढत गोपा चलपत्याच्या घरीं आला. दगडावर मटकन् बसला. चलपते बाहेर उभा होता त्याला म्हणाला, रामराम घालून म्हणाला, "बोकड घेताय नव्हं, चलपते ?"

"रुपयं सोळा मिळतील !"

"सोळा ?"

"हां, पयल वीस देत होतो, पण आता सोळा मिळतील!"

गयावया करून गोपा म्हणाला, "तस करु नगा जी. वीस द्या. कालच्या मारानं हात मोडलाय माजा. त्यावर दवापानी करीन. माजं ऐका, वीस द्या." आणि त्यानं चलपत्यापुढं डोकं टेंकलं !

# फक्कड गोष्ट

एका डोळयान पिचका असलेला रामा गुर लावून सावलीला बसला होता. त्यान पायातल्या वहाणा आणि डोईचा पटका काढून ठेवला होता. अटकळपाटकळ घातली होती.

दहिंवरान ओल्या झालेल्या गवतातून बूट ओढीत मी शेजारून जाऊ लागलो तेव्हां आपट्याच्या झाडाखाली बसलेला तो पिचका गुराखी खाकरून थुकला. पोटाच्या बुडातून आवाज काढून म्हणाला,

"या यकटगव !"

आसपासच रान हिरवगार होत. आभाळ स्वच्छ निळ होत. दूर दिसणाऱ्या डोंगराच्या उतरणीवर चरणाऱ्या गुराचे पांढरे ठिपके दिसत होते. खगेश्वरीच दिवस मोठा छान होता !

माजलेल्या गवताचा उग्र आणि ओला वास हुंगीत मी रामापाशी गेलो आणि गवतात टेकलो. पायांच्या पजांना सहा सहा बोट असलेला हा लुच्चा कुणबी माझा चागला मित्र होता. जवळ बोलावून तो माझ्याजवळची विडी ओढी आणि त्याच्या बदल्यात गप्पा हाणी. त्या पुष्कळ वेळा अडाणी विनोदानं गुळचट झालेल्या असत.

ओल्या बुटावरील माती आणि गवताचे तुकडे झाडीत मी म्हणालो,

"काय रामभाऊ, काय बेत ?"

उन्हान रापलेल्या त्याच्या तोंडावर लबाड हस आल. माझ्या पाठीवर थाप टाकून चिमटा घेत तो म्हणाला,

"फंस क्लास !"

त्याचं बोलणं आणि हावभाव नेहमीच इतके मजेशीर असतात कीं, पुष्कळ वेळा त्यानं काही विनोद केला नसतानाहि हसू येतं. तसं याहि वेळीं आलं. हसण्यामुळं माझे डोळे गालात बुडाले, तेव्हा तोहि पोटाला वळ्या पाडून हसला. उलथापालथा झाला. मग हंसण्याचा खदखदाट जिरवून त्यानं माझे खिसे चाचपले. मी ओळखलं आणि विडी, काडेपेटी त्याच्या हवाली केली. ती सबंध ओढून होईपर्यंत तो काही बोलला नाहीं. गवतात उताणा पडून मी रानची हवा खात राहिलो.

आपट्याच्या झाडावर मातकट रंगाचा एक सरूड उगीच बसून राहिला होता. खरोखरीच या मठ्ठ प्राण्याचा मला अगदी राग येतो. किंचित्हि हालचाल न करता तो एका जागी इतका वेळ बसून राहतो कीं, बघणारा कटाळून जातो. आवाज करा, खडे फेका—प्रत्यक्ष डोकं फुटेपर्यंत तो जागा सोडीत नाही !

समोर मुके राघू चलाख गिरक्या मारीत होते. काळ्या आणि टोचदार चोंचींत फुलपाखरं पकडून मटकावीत होते. आणि पलीकडे बाभळीच्या झुडपा-वर घोळक्यानं बसलेल्या कोकाट्या, नळावर भांडणाऱ्या बायकांसारखा कालवा करीत होत्या.

दरम्यान रामानं विडी विझवली होती. माझ्या मांडीवर चापटी मारून तो म्हणाला, "का असं पसरलाय उंडग्या बाईवाणी ?" आणि हसला. आज एकंदर त्याची लहर चावटपणाकडे लागली होती. तशी अनेक वेळा लागलेली मला ठाऊक होती. या लहरींत त्यानं मला ही फक्कड गोष्ट सांगितली.

एक वाणी होता. फाटक्या अंगाचा आणि मिरमिरा तोंडाचा. बाहेर आलेल्या डोळ्यांचा आणि बसलेल्या गालफडांचा. उभा राहिला म्हणजे त्याचे गुडघे एकमेकांना थटत. खाली बसला कीं खुब्याचं हाड वर दिसत. चालायला लागला की, हातभर कुबड वर निघे आणि बोलायला लागला म्हणजे शब्द तोंडात अडखळत. गावाच्या मध्यभागी त्याचं किराणा मालाचं दुकान होतं. दुकानापुढं त्याचं नाल पडलेलं घोडं कान पाडून शेपटानं गोमाशा उडवीत उभं असे आणि आतल्या बाजूला वाणी खाली मुंडी घालून गिऱ्हाइकाची वाट बघत बसलेला असे. त्याच्या डोळ्यापुढं बारीक चिलटं उडत. न धुतलेल्या ढोपरावर माशा बसत. मळकट अंगरख्याच्या पाठीवर मुंगळे चढत. तरीहि तो आपला

गप्प बसे. मोठ्या डोळ्याची अस्वस्थपण हालचाल करीत असे. मालाच्या डब्यापाठीमागून उंदीर डोकावत. लांबोडक तोंड मुळमुळ् हलवीत. उनाड आणि बेवारशी कुत्री उंबऱ्यात येऊन उभीं रहात. गुळाच्या ढेपीकडे अधाशीपणं बघत. तरी तो हालचाल करीत नसे.

अशा या गैंदी माणसाला देवान बायको मात्र मारू दिली होती. हळदीच्या रंगाची, उभार छातीची, फुगलेल्या अंगाची, फुलल्या जवानीची ! काळ्याभोर आणि मोटमोठ्या डोळ्याची ही बाई बदफैली चालीची होती, चवचाल वृत्तीची होती. गर्भरेशमी लुगडी नेसून ती गावभर हिंडे, जवानीच प्रदर्शन मांडे. तिला बघून गावातल्या पोरांना चळ भरे. रानामाळातल काम मोडून ते या नटरंगीच्या नादावर रहात. तिच्यापायीं जीव टाकत.

घोड्याच्या पाठीवर सामान लादून वाणी आठवड्यातून तीन बाजार घेई. सकाळी जाऊन मध्याकाळीं माघारी येई. तो घराबाहेर पडला कीं, सोकावलेली पोरं दुकानाभोंवती घिरट्या घालत. मागील दाराच्या भिंतीशी उभी राहून वाणीण त्यांना खुणा करी. एकादा साजरा पोर आत घेई. त्याला गोडधोड करून खाऊ घाली. तोंडात तोंड देई. लटक रागवी, लटक खिजवी आणि तृप्त होई.

प्रथम प्रथम हे व्यवहार चोरून होत. लाज झांकायची आणि अब्रू विकायची असा प्रकार. त्यासाठीं नाना खुणा, नाना युक्त्या. कधीं वाढलेलं पीक तर कधीं गावाबाहेरच देऊळ, कधीं पाणवठा तर कधीं घराचं माळवद. सारा प्रकार चोरून मारून, लोकांच्या नजरेंत न येईल इतक्या सावधपणं. पण चटक लागली तशी सावधानता लोपली. कधीं झाकला पदर ढळला, तरी धपका बसण्याऐवजीं केवळ ओझरती चुटपुट लागू लागली. हाहि प्रकार वारवार होऊ लागला आणि मग चुटपूटहि गेली. बघणारा शरमला तरी आपली पापणी खाली न पडेल इतपत मुजोरी अंगीं मुरली. वेळ अवेळ, घरदार याचा मुलाहिजा राहिला नाहीं.

चोरून तठल तरी झांकत नाही. वास झांकण घेत नाहीं. साऱ्या खेड्यांत बभ्रा झाला. लोक कुजबुजू लागले कीं, वाण्याच्या बायकोन गाव नासला. पोरं चळली. आखाड्यातली माती हलत नाहीं. दगडी गोट्या जागच्या उचलत नाहींत. सुरपाट्या नाहीत कीं लेझीम नाहीं. पोर पार बिघडली. वाणिणीनं सगळ्यांना वेड केल.

होतां होता ही कुजबूज वाण्याच्या कानापर्यंत गेली. गैदी असला, तरी तो नवरा होता. त्याला शरम वाटली. संताप आला. पण उडग्या बाईचा नवरा असण्यासारखं दुसरं दुर्दैव नाहीं. अवघड जागीं दुखणं. उघड करावं तर अब्रू जाते. झाकलं ठेवावं तर ठणका मारतं. अशा वेळीं अब्रूदार माणूस तोंडाला टाके घालतो आणि मन खातो. वाणी मनात झुरत राहिला. खाल्ल अन्न त्याला गोड लागेना. मग तो उगीचच व्यापारधंद्यात गुतून राहूं लागला. बाजाराला गेल्यावर दोन दोन रात्री माघारीं येईनासा झाला. आपल्या डोळ्यामाघारीं काहीं का घडेना, आपल्या पाठीमागं लोक काहीं का बोलेनात, असा विचार करून घरीं येण्याचं टाळू लागला.

मग तर वाणिणीला रान मोकळंच झालं ! रोजरोसपणं ती यार घरीं आणूं लागली. रोज नवी नवलाई शोधूं लागली. गावात कालवा फार झाला. तोंडावर पदर घेऊन बायका आपापसात कुजबुजूं लागल्या. उघड उघड बोलूं लागल्या कीं, तो अमका तमका वाणिणीशीं लागून आहे. जाणती माणसंहि फिदीफिदी हंसून हा विषय तंबाखूसारखा तोंडांत ठेवूं लागली. पोराठोरांत कुणी खेळणं धडोत घातलं, पटक्याला कोच काढली कीं, इतर पोरं डोळे मारून त्याला म्हणूं लागलीं,

"का, नंबर लागला काय ?"

नको तिकडून सुटलेलं अंग घेऊन वाणीण बदकासारखी रस्त्यातून जाऊं लागली म्हणजे गल्लीबोळातून विटीदांडू खेळणारी लहान पोरंसुद्धा चेकाळत. वाणिणीशीं सूतगूत असलेल्या एखाद्या पोराचं नाव मोठ्यानं ओरडत,

"अरे, नरम्‌ कावळ्याच्या महादा, कुठं चाललास ?"

हें सारं ऐकूण वाणीण गालात हंसे. डोळ्यापुढं हातभर पदर ओढून निघून जाई ! तिनं शरम, लाज खुंटीला अडकवून ठेवली होती. रस्त्यात गाठून ती एखाद्या पोराला धक्का देई. पायावर पाय देई. हात धरी. बेदरकारपणं म्हणे,

"कां, घराकडे येणं सोडलं अलीकडे ?"

गावचा पाटील एकदा भल्या पहाटे उठला. आणि चांदण्याच्या प्रकाशात जनावरांना पेंडी टाकण्यासाठीं आपल्या गोठ्याकडे गेला. गोठ्यांत अंधार

होता. डोळयाच्या बाहुल्या मोठ्या होईपर्यंत पाटील थांबला. आणि पेंडी काढण्यासाठीं वैरणीच्या ढिगापाशीं पोचला, तों त्याला धसफस ऐकूं आली. बागडण्याचा आवाज आला. कुणीतरी बाई माणूस अंधाऱ्या कोपऱ्यांतून सपाट्यानं उठलं आणि तरातरा गोठ्याबाहेर पडलं !

पाटील हबकला. चोरचिलट कीं भूतचेष्टा या जाणिवेनं हबकला. त्याचं काळीज धडधडलं. तेवढ्यात त्याच कोपऱ्यांतून आणखी कुणीतरी उठलं. मग पाटलानं नेट घेतला आणि आडवा होऊन आवाज दिला,

"कोण ते ? कोण हाय ?"

चलाखीनं गोठ्यातून निसटूं पाहणारा गडी अडवल्यामुळं जागच्या जागीं खडा राहिला. न बोलता सवरता.

पेंडी तोडायची कुऱ्हाड उगारून पाटलानं पुन्हा दम भरला,

"कोण हाय ? बोलायला तोंड नाही का ?"

तरी तो हुमनदांडगा गडी गप्पच राहिला. तो उलटत नाही त्याअर्थी गांगरला आहे एवढा पोच पाटलाला आला आणि मग झपाट्यानं पुढं होऊन त्यानं कुऱ्हाडीचा तुंबा त्या गड्याच्या खांद्यावर ठेवून दिला ! त्यासरशीं तो कळवळला.

"मी आहे पाटील. ओळखलं नाहीं का ?"

"मी म्हणजे कोण ?"

"नरगू कांबळ्याचा महादा."

"हां. महाद्या ? आणि इथं गोठ्यात कशाल्या आला होतास मरायला ?"

महादा बोलला नाही. सणकणारा खांदा चोळीत गप्प उभा राहिला. मग पाटलाला ही भानगड उमगली. चोरचिलट नाही कीं भूतचेष्टा नाहीं. हा प्रकार जारजारिणीचा आहे हे त्यानं ताडलं. त्या अनुषंगानं निघून गेलेली बाई कोण हेंहि हेरलं आणि मग त्यानं महादाला फैलावर घेतलं,

"महाद्या, खरं सांग. चोरी करणार होतास काय माझ्या वैरणीची ?"

"नाहीं पाटील. अन्नाची आण, नाहीं !"

"मग माझं ढोर पळवणार होतास ?"

"नाहीं पाटील, अन्नाची आण, नाहीं !"

"मग का आला होतास माझ्या गोठ्यात ?"

महादाची दातखीळ उचकटेना. तेव्हा अधिकारान आणि वयान मोठा असलेला पाटील पुढं झाला. कानाला पकडून त्यान महादाला उजेडात आणलं.

"महाद्या, खरं बोल. नाहीं तर माझ्याशीं गाठ आहे !"

"होय, पाटील !"

"तुझ्यासंग दुसरं कोण होतं ?"

उत्तर नाही.

"दोस्त होता का कोणी ?"

"नाहीं पाटील. अन्नाची आण, नाहीं !"

"मग ? कुणी नव्हतं का ? तू एकटाच पेंडीमागं होतास का ?"

उत्तर नाहीं.

"अरं, झोपला होतास का गोठ्यात ? नशापाणी केली होतीस का रात्री ?"

पण महादा बोलेना. सायनासंगीत सापडल्यामुळं तो जवान पोरगा शरमला होता. वडीलधाऱ्या पाटलाला तो डाफरू शकत नव्हता. तोंडाला खीळ घालून गप्प बसण्यासारखा शहाणपणा नव्हता ! नरसूचा महादा घुम्यासारखा उभा राहिला. बोलेल ते निमूट सहन करू लागला. तेव्हा पाटलान आणखी दोन तुंबे त्याच्या पाठींत रपवले.

"हो चालता. गुलामा ! घरात अन्न नाहीं खायला, आणि रंडीबाजी करतोय् ! सोदा कुठला ! हो घराकडे, नाहीं तर टकुर फोडीन कुऱ्हाडीनं !"

आणि नरसूचा महादा चोरासारखा चालता झाला ! शरमलेला, वरमलेला. घटकेपूर्वी सुखावलेला आणि आता दुखावलेला.

पाटील स्वतःशीच बडबडत राहिला,

"बाइली, सगळा गावच सोद्यांनीं भरला. चहूंकडे हेच झालय् ! सगळा गाव सोद्यानी भरला !"

सकाळ झाली तसा तरातरा पाटील वाण्याच्या दुकानाकडे गेला. भवानीची वाट बघणाऱ्या वाण्याला म्हणाला,

" काय र, तुझी बायको हाय का ? "

पाटलाला जागा देत वाणी अदबीनं म्हणाला,

" नाहीं पाटील. दूध आणायला गेलीय् न्हाव्याच्या घराकडे. का हो ? "

करून दिलेल्या जागेवर पाटील बेतान टेकला आणि कमावलेल्या आवाजात म्हणाला,

" अरे, मर्दासारखा मर्द तू. बायकोचा बाहेरख्यालीपणा उघडया डोळ्यांनीं बघतोस ? "

वाण्याचा गालफड बसलेला चेहरा सारवलेल्या सुपासारखा झाला. खालीं मान घालून तो लोखंडी वजनं एकमेकावर रचू लागला.

" लेका, मुक्या जनावराला चीड आली असती ह्या गोष्टीची आणि तूं तर माणूस. असा मेल्या मनाचा का झालास ? "

वाणी पडक्या आवाजात म्हणाला,

" इलाज नाहीं पाटील. मला काय कळत नाहीं का ? माझं रक्त तापत नाही का ? पण काय करावं ? आपलेच दात आणि आपलेच ओठ ! "

" ह्या ! असा बाइल्या नको होऊस. नेट धर. धरून बडव तिला एकवार कुत्र्यासारखी. "

" काय उपयोग होणार नाही. फुकट माझे हात दुखतील. तिची खोड जाणार नाहीं. जित्याची खोड मेल्याशिवाय जाणार नाहीं. "

" मग मार. घे जीव ! असली बायको असण्यापेक्षा नसल्याली परवडली. डोक्यांत धोंडा घालून जीव घे आणि हो मोकळा ! "

" कसा होईन मोकळा ? तिचा श्राप लागल तो लागल आणि जाईन फासावर ! काय फायदा ? "

प्रत्येक गोष्टींत फायदा बघणारा वाणी असं बोलूं लागला, तेव्हा म्हातारा पाटील निरुत्तर झाला. तो म्हणाला,

" गड्या, माझ्या डोळ्याला हें बघवत नाहीं, कानाला ऐकवत नाही ! "

" मला ऐकवत का पाटील ? माझ्या डोळ्याला बघवत का ? पण काय करणार ? इलाज काय ? "

पाटील गप्प बसला.

मग वाणी एकाएकीं खाली आला. ऐकून कणव यावी अशा आवाजात म्हणाला,

" पाटील, तुम्ही जाणती माणसं. तुम्हीच सांगा, मी काय करूं ? कसा वागूं ? ह्या व्यापांतून कसा सुटूं ? "

पाटलानं हाताचे दोन्ही तळवे चोळले. खाली मान घालून थोडा विचार केला आणि तो म्हणाला,

" गड्या, हें गाव सोद्याच आहे. तुझी बायको ह्या सोद्यानी बिघडवली. त्यात तुझा काय दोष ? तिचा तरी काय गुन्हा ? आं ? "

" तसं का म्हणा ना. पण त्यावर तरी इलाज काय ? हे बंद कसं होणार ? कसं थांबणार ? "

" गड्या, तू हे गाव सोड. सोद्यानी भरलेल्या या गावात राहू नकोस ! "

" बरं. पुढं ? "

" एखाद लांबचं गाव बघ आणि तिकडे बिऱ्हाड कर. दुकान कर. बिन-घोरीपणानं रहा. "

" पाटील, आता इथं जम बसलाय्. गिऱ्हाइकाशीं वळण पडलंय्. तरी मी तुमचं म्हणणं ऐकतों. "

अशी बोलाचाली झाली. पाटलाचं सांगणं वाण्याला पटलं. त्यानं गांव सोडण्याचं ठरवलं. ठरवलं पण कुठं बोलला नाहीं, चालला नाहीं. बाजारच्या गांवाला जाताना एक बऱ्यापैकीं गांव निवडलं. तिथल्या चारदोन मंडळींशीं ओळखी करून घेतल्या. रुपया आठ आणे भाड्यानं एक घर घेतलं. आणि घरीं येऊन बायकोला म्हटलं,

" सामानाची आवराआवर कर. हें गाव सोडायचं !"

आपल्या मरतुकड्या घोड्यावर बसेल तितक सामान लादून वाण्यान एक खेप केली. डाळी, तादूळ, शेंगदाणे असला माल नेऊन त्या घरीं टाकला. दुसरी खेप केली. मोकळीं उघडीं पोतीं, चिपटीं, मापटीं, पावशेर, छटाक, हे नेले. दुकानची भानगड सपली तसा तो पुन्हा बायकोला म्हणाला,

"तुझ सगळं आवर. आपल्याला हे गाव सोडायच आहे."

ती बोलली नाही, सवरली नाहीं. मुकाट्यानं सामानाची बाधाबाध करू लागली. एक गट्ठा भाड्याचा. एक गठ्ठा कपड्यांचा. ते सार घोड्यावर लादून वाण्यानं तिकडे नेऊन टाकलं. अशा बऱ्याच खेपा झाल्या तेव्हा सगळ सामान हलवून झालं. वाणीणच तेवढी न्यायची राहिली.

शेवटीं वाण्यानं पाटलाचा, चार सबधी लोकाचा निरोप घेतला. वाणी गाव सोडून का निघाला ही भानगड कुणाला ठाऊक नव्हती. पण या बनावामुळं कोणी म्हणालं,

"बर झालं, गावची पीडा गेली!"

कुणी म्हणाला,

"आता गावच्या पोरांची गैरसोय झाली!"

कुणी काहीं का म्हणे ना, वाणी निघाला. कोणत्या गावीं निघाला ते त्यान सांगितल नव्हतं.

दुकान मोकळ झाल. उरल सुरलेल सामानहि घोड्यावर लादल. आतां निघायच. घोड्यावर बसायच आणि गावाबाहेर पडायच.

वाणी घोड्याचा लगाम धरून बाहेरून म्हणाला,

"आटप, लवकर बाहेर ये. मी कुलूप घालतोय्."

वाणीण रिकाम्या घरातून बाहेर येऊन उभी राहिली.

"काही राहिलं का ग?"

"नाही!"

"लावू कुलूप?"

"लावा."

हेंहि घर भाड्याचंच होतं. कुलूप लावायचं आणि मालकाच्या हवाली चावी करायची व चालू लागायच.

दार ओढून वाण्यान कुलूप लावलं आणि तो म्हणाला,

" चला. "

दोघहि चार पावल गेलीं आणि एकाएकीं वाणीण म्हणाली,

" थांबा, थांबा. माझा एक जिन्नस राहिला ! "

वाण्याला आश्चर्य वाटलं. सगळं घर, दुकान रिकामं केलेलं त्याला ठाऊक होत. त्यान बघितल होतं. मग हिची वस्तु ती राहिली काय ?

" काय राहिलं ग ? "

" राहिलाय् एक जिन्नस. किल्ली द्या इकडे. "

वाण्यानं मुकाट किल्ली दिली. या हरदमख्याली बाईन चोरून मारून पैसा ठेवला असेल आणि तो ऐत्या वेळीं विसरली असेल. कदाचित् एखादा डागिना पुरून ठेवला असेल, असा विचार करीत तो दाराबाहेर उभा राहिला.

वाणिणीन कुलूप काढून दार उघडलं आणि ती आत गेली.

वाणी उत्सुकतेन बघू लागला. गेली तशी वाणीण बाहेर आली. तिच्या हातात दाराला लावायचा धोंडा होता.

तो घेऊन ती आली आणि नवऱ्याला म्हणाली,

"हां, आता लावा कुलूप !"

महत्त्वाचा जिन्नस म्हणजे दाराला लावण्याचा धोडा हे जाणून वाणी तापला व म्हणाला,

"राडे, दाराला लावण्याचा धोंडा इथून तिकडे न्यायला तिथं काय धोंडे नाहींत ?'

त्यावर एक हात पुढं करून वाणिणीन स्वच्छ उत्तर दिलं,

" आणि मुड्या, ह्या गावांत सोदे आहेत म्हणून मला त्या गांवांत नेतोस. तिथ काय सोदे नाहींत ? "